







नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








# दीपावली

**साहित्य • कला • संगम**

## श्रेयनामावलि—






वर्ष १५ वें
एप्रिल १९५९

**दीपावली**—मासिक दर महिन्याच्या एक तारखेस प्रसिद्ध होतें.

संपादक-मुद्रक-प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल.** दलाल आर्ट स्टुडियो ४०–४२ केनेडी ब्रिज मुंबई नं. ४. प्रत्येक प्रतीस किंमत रु. १. अधिक रजिस्टर पोस्ट ५० नये पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२. या अंकांत प्रसिद्ध झालेली मतें चालकांची अधिकृत मतें असतातच असें नाहीं.





दलाल आर्ट स्टुडिओ — ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४





अनुक्रमणिका



आज मराठी मुलुखाच्या दक्षिणेकडील सरहद्दीवर सीमावाद फार तीव्र झाला आहे. कर्नाटक आणि महाराष्ट्र या दोन देशांत अप्रेम असें कधीं नव्हतेंच. उलट संस्कृति, आचार विचार आणि वाङ्मय यांची दोन्ही देशांतील देवाणघेवाण फार जुनी आहे. त्यामुळें ' वेंकटाध्वरि ' नांवाच्या कर्नाटकी पंडितानें १६५० च्या सुमारास लिहिलेल्या विश्वगुणादर्श ग्रंथांतील हा महाराष्ट्र विषयक उतारा वाचकांस मोठा मनोरंजक वाटेल. या कर्नाटकी पंडितानें आपल्या उपरोक्त ग्रंथांत गुजराथ, महाराष्ट्र, आंध्र, कर्नाटक या प्रदेशांतील लोकस्थितीचें गुणदोष दाखविणारें वर्णन केलें आहे. गुणग्राही विश्वावसु आणि दोषदर्शी कृशानु अशा दोघां गंधर्वाच्या लोकस्थितीपर संवादानें हा ग्रंथ सजविलेला आहे. ' विश्वगुणादर्श ' काराच्या काळांतील महाराष्ट्रवीरांच्या पराक्रमाचें हें पुढील चित्र आणि त्याचें खंडन वाचकांना मोठे उद्बोधक वाटेल.

**विश्वावसु**—महाराष्ट्र नांवाच्या या देशाला दुसरी जोड सांपडणार नाहीं. येथें गोड पाण्याची संपन्नता आहे. हा उज्ज्वल देश इंद्रनगरीप्रमाणें गाजतो. गुणांनीं सागराप्रमाणें विशाल असलेले अनेक वैभवशाली गृहस्थ मोठ्या श्रद्धेनें अभ्यागतांचे आदरातिथ्य करतात.

**कृशानु**—अफाट व्यापारानिमित्त दाहीदिशांत संचारणारे महाराष्ट्रीय कधीं योग्य वेळीं स्नानसंध्या करीत नाहींत. आपला खरा व्यवसाय सोडून कुळकर्णपण व कारकुनी करून कसातरी काळ कंठतात. लग्नामुंजीच्या सोहळ्यांची येथील ब्राह्मणांना भारी हौस. कलिप्रभावापायीं या सोहळ्याकरितां ते काळवेळ पहात नाहींत. ज्या वयांत वेदपठन करावयाचें त्या वयांत यवनांची भाषा व लिपि ते शिकतात. अडाणी व लोकवार्ता बडबडणाऱ्या या ब्राह्मणांची मंत्रोच्चारणाच्या प्रसंगीं जणूं दांतखीळ बसून जाते. त्यांचा सगळा वेळ गांवच्या जमाखर्चाची उठाठेव करण्यांत जातो. यांचें ब्राह्मण्य अगदीं विचित्र जगावेगळें आहे. पोटाची खळी भरावी म्हणून वेतनाच्या मोबदल्यांत शरीर विकून हे यवनांची चाकरी करतात. ही चाकरी बजावतांना हिशोबाच्या चलाखीनें आपल्या धन्याचें द्रव्य चोरायलाहि यांना दिक्कत वाटत नाहीं. ज्याला दहापांच वेदाक्षरें येत असतील तो व्यासाचा व एखादा श्लोक म्हणूं शकणारा तो प्रत्यक्ष बृहस्पतीचा अवतार अशी यांची समजूत आढळते. योग्य उपासनाविधि जो जाणणारा तो मूर्तिमंत आपस्तंभ ऋषीच, असें यांना वाटते. शिष्टांचा क्षय करणाऱ्या या कलियुगांत सर्व विद्या रोडावल्या आहेत.

**विश्वावसु**—अरे, ब्राह्मणांची अशी निंदा करतोस ऐकतर—येथें पुष्कळ ब्राह्मण अग्निहोत्री, शास्त्रार्थज्ञानी व शांत स्वभावाचे आहेत. तसेंच अंतर्मुखवृत्तीनें आत्मचिंतन करणारे आणि बाह्यविषयाचा त्याग साधून सर्वस्वीं वेदमार्गांत गढलेलेहि अनेकजण आहेत. स्तानानें पवित्र व श्रुतिपुराणाच्या नियमानुसार (पान ५ वर)




समाजवादी गोवर्धनोद्धार



भारतीय संस्कृतीचीं प्रतीकें : २ **मर्यादापुरुषोत्तम राम**

रामं दूर्वादलश्यामं पद्माक्षं पीतवाससम्
स्तुवन्ति नामभिर्दिव्यैर्न ते संसारिणो नरः

**—रामरक्षा**

हरळीचें दळापरी सांवळा, डोळे सौम्य दाविती कमळां
नेसला पीतांबर पिंवळा, श्रीराम तो
तया श्रीरामाची स्तुति, दिव्य-नामजपें जे करिती
संसारामाजीं असोनिया नसती, पुरुष ते

दासनवमी
शके १८८१ } **ग. दि. माडगूळकर**

अनुक्रमणिका







## या महिन्यांतील माननीय व्यक्ति :



## डॉ. मुकुंदराव जयकर

बॅरिस्टर जयकर हें नांव महाराष्ट्रीय माणूस पिढ्यान पिढ्या लोटल्या तरी विसरणार नाहीं. कारण मराठी माणसाच्या गुणावगुणाचा परमोत्कर्ष म्हणजे डॉ. मुकुंदराव जयकर. मोठ्या घराण्याची प्रतिष्ठा घेऊन जन्माला आलेला हा पुरुष पुढें महाराष्ट्राचीच काय पण भारताचीहि प्रतिष्ठा वाढविता झाला. गेल्या पिढींतील सनदशीर राजकारणाच्या युगांत जयकर आपल्या तेजःपुंज व्यक्तिमत्वामुळें आणि घडाडीमुळें आघाडीवर चमकत होते. सप्रु–जयकर ही जोडी म्हणजे नवशिक्या राजकीय कार्यकर्त्यांचा हक्काचा मार्गदर्शक. गेल्या पिढींत कायदेपंडितांनींच सारें राजकारण खेळविलें पण या कायदेपंडितांतील जयकर हे पंडितश्रेष्ठ. हिंदु कायद्यावरचा त्यांचा प्रगाढ व्यासंग आतां त्यांच्यावरोबरच अस्त पावला. जयकरांचें व्यक्तिमत्व आणि वक्तृत्व यांतील अधिक सरस आणि प्रखर कोणतें हें जयकरांनाहि सांगतां आलें नसतें. अमोघ इंग्रजी वक्तृत्व ऐकण्याचे दिवस आतां यापुढें इतिहासजमा झालें असले तरी त्यांतील जयकरांचा लौकिक कायम राहाणार आहे. ईश्वरानें त्यांना सर्वच गुण 'अनंतहस्तें' बहाल केले होते. त्यामुळें ज्या ज्या आघाड्यावर जयकर गेले त्या त्या आघाड्यावर त्यांनीं अग्रस्थान मिळविलें. राजकारण आणि समाजकारण हा त्यांच्या हातचा मळ होता. पण शिक्षणाच्या क्षेत्रांतहि त्यांनीं आपलें अलौकिकत्व आणि असामान्यत्व प्रकट केलेली पुणें विद्यापीठाची आजची प्रगति म्हणजे जयकरांचे अपार कष्ट आणि असीम तळमळ.

पण एवढा उत्तुंग हिमालयाएवढ्या कर्तृत्वाचा हा महापुरुष स्वतंत्र भारतांत उपेक्षितच राहिला. याचें कारण जयकरांचें महाराष्ट्रीयत्व आणि मराठी मनोवृत्ति. या मनोवृत्तीला हांजी हांजी करणें जमत नाहीं, असल्याशीं समझोता करणें रुचत नाहीं. आणि खरं बोलल्याशिवाय राहवत नाहीं. मात्र यामुळें जयकरांपेक्षां राष्ट्राचेंच नुकसान अधिक झालें ही गोष्ट मात्र निर्विवाद. कारण प्रगाढ व्यासंग आणि अमोल ग्रंथसंग्रह यांत जणूं काय स्पर्धाच लागलेली. मात्र त्यामुळें त्यांची रसिकता कधीं लोपली नाहीं.

जयकरांच्या मृत्यूमुळें महाराष्ट्राचें कधींहि भरून न येणारें नुकसान झालें आहे. • • •

---

(पान ३ वरून) स्पर्शास्पर्शविचार कटाक्षानें पाळणारेहि बहुत ब्राह्मण आढळतात. देवपूजा आटपून मग शुद्ध निर्दोष अन्न ग्रहण करणें हा महाराष्ट्र देशाचा फार मोठा गुण आहे.

महाराष्ट्रांतील ब्राह्मण वर्ग शिपाईगिरीच्या किंवा राज्यकर्तृत्वाच्या अधिकारावर आहेत हें खरें, पण त्यांनीं हा अधिकार हातीं घेतला नसता तर सारी पृथ्वी यवनांच्या तावडींत सांपडली असती.

**कृशानु**—आतां अब्राह्मणांची स्थिति पहा.

द्रव्यलोभानें देशभर धुडगूस घालणें, ब्राह्मणांना छळणें, दुसऱ्याचें द्रव्य लुटणें व आपला तळीराम गार करणें, असा त्यांचा खाक्या जाहे.

**विश्वावसु**—तुझें म्हणणें खरें आहे, पण त्याचा हा व्यवहार सोसला पाहिजे. महाराष्ट्रांतील रणपटु वीर आपल्या गनिमी काव्याच्या योगानें शत्रूंच्या ठिकाणीं दहशत उत्पन्न करून जिकडे तिकडे जर न फिरतील तर तुर्कांचीं मनोराज्यें निर्विघ्नपणें सफल होऊन पृथ्वीवर देव ब्राह्मणांचे नांव देखील उरणार नाहीं. देवाब्राह्मणांच्या हिताकडे लक्ष देऊन म्लेंच्छांची दाणादाण उडविणाऱ्या महाराष्ट्रीय वीरांची धामधूम सहन केली पाहिजे. जाळें रोगांचें नष्ट करणाऱ्या उग्र औषधांचा कडूपणा देहाचें आरोग्य प्रिय असेल तर सोसणें भागच असते. • •








# दीपावली



हा महिना शिमग्याचा आहे. शिमगा हा मोठा प्रसिद्ध आणि लोकप्रिय सण आहे. शिमग्याची लोकप्रियता सारखी वाढतच आहे. पूर्वी वर्षांतून एकदांच शिमगा येत असे. आतां आमचा शिमगा बारमहा चालू असतो. तांदूळ महागला म्हणून आम्हीं शिमगा करतों ! रॉकेल अदृश्य झालें म्हणून आम्हांला बोंब मारावी लागते. जागेची टंचाई वाढली म्हणून आम्हीं शंखध्वनि करीत असतों. संयुक्त महाराष्ट्रासाठीं आम्ही घसा कोरडा होईपर्यंत बोंब टोकीत आहोंत. ही बोंब चालू असतांच आमच्या रक्ताची रंगपंचमीहि साजरी झाली. आमच्या सीमेवरहि तोच प्रकार चालू आहे. तेथेंहि रक्ताच्या पिचकाऱ्या बारमहा उडत असतात. घरादारांची होळी पेटत असते. बायकांची विटंबना होत असते. तेथेंहि बोंब चालूच आहे. सतत आणि सारखी बोंब चालू आहे.

अच्युतराव कोल्हटकरांच्या भाषेंत सांगतों. सतत आणि सर्वत्र आमची बोंबाबोंब चालू आहे. गोव्याच्या विषयांत आमची बोंब आहे. जातीय ऐक्याच्या विषयांत आमची बोंब आहे. शिक्षणाच्या विषयांत आमची बोंब आहे. खाण्यापिण्याच्या विषयांत आमची बोंब आहे. अर्थकारणाच्या विषयांत आमची बोंब आहे. आणि परमार्थकारणाच्या विषयांतहि आमची बोंब आहे. क्रिकेटच्या विषयांत देखील आमची बोंबच आहे.

कोण म्हणतो आमचा शिमगा संपला ? जुने सुधारक शिमग्याच्या नांवानें खूप शंख करीत असत. ह्या सणावर त्यांनी खूप चिखलफेक केली. ह्या सणाविरुद्ध खूप बोंब मारली. अगदीं उंच स्वरांत आणि अर्वाच्य शब्दांत बोंब मारली. पण त्याचा परिणाम काय झाला ? आमचा शिमगा संपला काय ? आमची बोंब थांबली काय ? आमची नैतिक पातळी उंचावली काय ?

छेः छेः तशांतला कांहीं एक प्रकार नाहीं. आमची नीति उंचावली नाहीं. आमची कृति उंचावली नाहीं. आमची उक्ति सुधारली नाहीं. पूर्वी आम्ही वर्षांतून जें एकदांच करीत होतों, तें वर्षभर करूं लागलों. जें थोडीच माणसें कांहीं वेळ करीत असत ते सर्व माणसे सर्ववेळ करूं लागली. आम्हीं सारे सर्वदा कशाच्या ना कशाच्या नांवाने शिमगा करूं लागलों. ह्या शिमग्यापासून अलिप्त म्हणून कोणी राहिला नाहीं.

लेखकांनीं आपआपल्या टोळ्या केल्या व ते एकमेकांच्या नावाने शिमगा करूं लागले. राजकारणी माणसांचे गट बनले व ते परस्परांच्या नांवानें बोंब टोकूं लागले. वृत्तपत्रांनीं शिवराळ शब्दांची दैनंदिन धुळवड सुरू केली. भल्याभल्यांनीं शिवीगाळीचे असे कांहीं विक्रम केले कीं ते पाहून होळीच्या जातिवंत होळकरानेहि तोंडात बोट घालावें ! श्रमिक धनिकांच्या नांवाने बोंब मारूं लागले. धनिक श्रमिकांच्या नांवाने शंख करूं लागले. एक धर्म दुसऱ्या धर्माच्या नांवाने ओरडूं लागला. एक जात दुसऱ्या जातीच्या नांवाने किंचाळूं लागली. एक पक्ष दुसऱ्या पक्षाची प्रेतयात्रा काढूं लागला. नेते समाजाच्या नांवाने शंख करूं लागले. समाज नेत्यांच्या नांवाने फाल्गुनवाद्य वाजवूं लागला. लखनौ विद्यापिठांत शिमगा असा कांहीं गाजला कीं पोरीबाळींना तेथें थांबण्याची सोयच उरली नाहीं. शिक्षक विद्यार्थ्यांच्या नांवाने बोंबा मारूं लागले व विद्यार्थी शिक्षकांवर शेणमार करूं लागले. फार काय सांगावें स्त्रीपुरुषांत देखील हा शिमग्याचा खेळ सुरू झाला.

जुन्या शिमग्यांत पुरुष बायकांच्या नांवानें बोंबा मारत असतील. आतां बायकाहि पुरुषांच्या नांवानें बोंबा मारूं लागल्या. दोघेहि ह्या नव्या खेळांत रंगले. पूर्वी ठरलेल्या दिवशींच रंग टाकला जात असे. आतां बायका प्रतिदिवशीं भडक रंग वापरूं लागल्या. कपड्यांचे भडक रंग ! ओठांचे भडक रंग ! भाषेचे भडक रंग ! अविर्भावांचे भडक रंग ! पोटापाठीचे भडक रंग ! उघडेपणाचे भडक रंग !

ह्याच रंगीत उघडेपणाचें प्रदर्शन रुपेरी पडद्यावर मांडले गेलें. मासिकांच्या मुखपृष्ठांवर स्त्रीचे तेच रंग उतास आले ! साहित्यांतहि तोच रंग ! उघडेपणाचे रंग—स्त्रीचे रंग—स्त्रीच्या अवहेलनेचे व अपमानाचे रंग ! नव्या शिमग्याचा रंग ! पूर्वीच्या शिमग्यांत स्त्रीची अवहेलना एकच दिवस होत असेल ! आतां ती सर्रास सुरू झाली ! प्रचंड गर्दी जमविणारे विनोदी वक्ते व्याख्यानागणिक स्त्रियांचा शाब्दिक मर्यादाभंग करूं लागले. वाटेवरच्या गर्दीत स्त्रियांशीं शारीरिक लगट सुरू झाली. नितंबयोनीवादी नवलेखक दुःशासनासारखे चेकाळले ! त्यांतच रस्त्यावरच्या रोमिओंची भर पडली. बायका त्यांच्या नांवाने शंख करूं लागल्या; व ते बायकांच्या नांवाने







शिमगा करूं लागले. बायका म्हणतात ते बिघडले व ते म्हणतात बायका बिघडल्या.

खरें सांगायचें तर सारेंच बिघडलें आहे, सारीच बोंबाबोंब आहे. सर्वत्र शिमगा चालू आहे. ह्यापेक्षां तो मोजक्या दिवसांचा शिमगा बरा होता. त्या शिमग्यांत माणसें उतास जाणाऱ्या आनंदानें शंख करीत असत. त्या शंखवादनांत स्वार्थ नव्हता. व्यक्तिद्वेष नव्हता. नुसतीच मोकळी मस्ती होती. निरोगी रग होती. आमच्या सडक्या सभ्यतेपेक्षां ती मोकाट असभ्यताहि अधिक शुद्ध होती. संभावितीचे सोंग घेऊन वावरणाऱ्या आमच्या भुरट्या आणि भित्र्या अश्लीलतेपेक्षां ती बेधडक अश्लीलता कमी अश्लील होती. सर्वव्यापी व सर्वगामी बनलेल्या आमच्या नव्या लिंगवेडापेक्षां तें एका दिवसाचें लिंगवेड अधिक नैसर्गिक होते अधिक हितकर होतें.

त्या एका दिवसांत आम्हीं मनांत साचलेल्या साऱ्या वासनांना वाट देत असूं! सारी मानसिक जळमटें झटकून टाकीत असूं. सारे गंड विसरून जात असूं. साऱ्या भेदांचे विसर्जन करीत असूं. त्या दिवशीं निर्धन आणि सधन एकाच पातळीवर येत! सबळ आणि दुर्बळ परस्परांवर रंग फेकीत! विद्वान् आणि अक्षरशत्रू परस्परांवर आणि शिमगा ऐन जोरांत चालू असतां आम्ही फार बिघडलो होतो ह्याला पुरावा काय? विवेकानंद, नौरोजी, टिळक, आगरकर, भांडारकर, सावरकर, रणजी, नायडू, बाळू, गणपतराव जोशी, केशवराव भोसले, इतिहासाचार्य राजवाडे, खाडिलकर, केळकर, केतकर, गडकरी, केशवसुत, तांबे, आपटे आदि अनेक क्षेत्रांतली पर्वतासारखी उंच माणसें "त्या" काळानेच उत्पन्न केली. तेव्हां स्वार्थ इतका नव्हता, गटबाजी इतकी नव्हती, द्वेष इतका नव्हता, अश्लीलता सुद्धां इतकी नव्हती! आम्ही खरे खुरे बिघडलो आहोंत आज. जुना शिमगा आम्हांला बिघडवणार तो कसा? शिमग्यांत जागोजाग पेटणाऱ्या होळीमुळें वायुमान स्वच्छ होतें. शिमग्यातल्या मनसोक्त मंत्रघोषानें कोंडलेली मनें स्वच्छ होतात. त्या मुक्त कंठातील व मुक्त छंदातील मंत्रामुळें तरुण पिढीच्या लैंगिक शिक्षणाचा प्रश्न आपोआप सुटतो. जन्माचे लैंगिक शिक्षण एक दिवसांत देण्याचें सामर्थ्य त्या मंत्रांत आहे! (लैंगिक शिक्षणाचा पुरोगामी प्रश्न आधीच सोडवून ठेवणाऱ्या आमच्या दूरदर्शी पूर्वजांना धन्यवाद!) शिमग्याच्या निमित्तानें सारी मानसिक व अन्य गटारे आपोआपच स्वच्छ होतात. हें कार्य सर्वोदयवादांत सर्वस्वीं बसतें. शिमगा




अबीर गुलाल उधळीत. सारी माणसें नादमय होत! गीतमय होत! आनंदमय होत! येत्या वसंताच्या रंगानें रंगून जात! उच्चरवानें त्या ऋतुराजाचें स्वागत करीत! जागोजाग प्रज्वलीत झालेला अग्नि दिशा उजळून टाकी! रात्रीचा दिवस बने! व त्या प्रकाशमय रात्रींत सारे गिरक्या घेत व सारे झिंगून जात. साऱ्या आधिव्याधींचा, साऱ्या संदेहांचा व संकेतांचा माणसांना विसर पडे! दुथडी भरून वाहणाऱ्या आमच्या उग्र उल्हासाला ही स्त्री आणि हा पुरुष असा भेदहि त्या दिवशीं मानवत नसे.

आदि मानवांतील अनेक उर्मट व अवखळ वृत्तींच्या नैसर्गिक प्रकटिकरणाचा तो दिवस होता. त्या दिवशीं आम्ही कांहीं लपवीत नव्हतों अनेक बंधनानी जखडलेले आम्ही त्या दिवसापुरतीं सारीं बंधनें अगदीं उघड्या डोळ्यांनीं सैल करीत असूं आणि दुसऱ्याच दिवशीं अधिक हलक्या व निर्मळ मनानें त्या साऱ्या बंधनांचा स्वेच्छेने स्वीकार करीत असूं! वर्षभर बंधने पाळतां यावींत म्हणूनच एक दिवस आम्ही साऱ्या बंधनांचा निरोप घेत असूं! वर्षभर शिमगा करण्याऐवजीं आम्हीं एक दिवस शिमगा करीत असूं.

तर मग तेंच आतां आम्हीं पुनश्च एकदां करूं या. सगळ्यानीं सर्वत्र व सर्वदा बिघडण्यापेक्षां ते एका दिवसाचे बिघडणें बरें! हा लोकवादाला फार पोषक आहे. शब्द व कृतीच्या एकाच पातळीवर सारी माणसें तेव्हां येतात. आमचे 'नेहेरू चाचा' देखील होळी खेळतात ते उगाचच काय?

तेव्हां आपण सारे आतां शिमगा खेळूं या. शिमगा हा रंगाचा सण आहे. शिमगा हा गाण्याचा सण आहे. शिमगा हा मुक्त ध्वनीचा सण आहे. शिमगा हा मुक्त वृत्तीचा सण आहे. शिमगा हा अग्नीचा सण आहे. शिमगा हा अबीर गुलालाचा सण आहे. तो नव्या फुलांचा सण आहे. नव्या ऋतूचा सण आहे. हा अवखळ, आनंदप्रद, उग्र व उत्कट शिमगा आपण एकदांच मोकळेपणें खेळून घेऊं या. वर्षातून एकदांच आपण नाचूं या, गाऊं या! शंखध्वनि करूंया व स्वतःला विसरून जाऊं या! म्हणजे उरलेले वर्ष स्वतःची ओळख आम्हीं विसरणार नाहीं. वर्षभर आम्हीं परस्परांवर चिखलफेक करणार नाहीं. द्वेषाचे कोलीत नाचवणार नाहीं. अतृप्त वासनांनीं धुमसणार नाहीं. लिंगवेडाच्या शेणखळ्यानें रंगणार नाहीं. सतत आणि सर्वत्र फाल्गुनवाद्य वाजविणार नाहीं.

म्हणून चला, ह्या फाल्गुनांतच आपण शिमगा साजरा करूंया.

—पुरुषोत्तम



अनुक्रमणिका



# तपस्वी

*हा गृहस्थ प्रतिदिवशीं एक ते दीड पेग व्हिस्की घेत असे. फोरासरोडवरील एका वेश्येला त्याच्याकडून पैसे जात असत. ठरलेलें लग्न त्यानें मोडलें होतें. आणि तरीहि तो होता मात्र—*

**पु. भा. भावे**

फलाटावर नेहेमींची गर्दी होती. आणि स्थानिक गाडीच्या त्या डब्यांतहि गर्दी होती. धक्क्यावरची गर्दी डब्यांकडे सरकत होती आणि डब्यांडब्यांतून शिरत होतीं. जिकडे तिकडे चेहरेच चेहरे दिसत होते. अक्षरांनी भरलेल्या वृत्तपत्रांतल्या रकान्यासारखी ती चेहऱ्याची गिचभिड दिसत होती. कुठल्याच चेहऱ्याचा नीटसा अर्थ लागत नव्हता. कारण तेथें माणसें नव्हतीं, नुसता जमाव होता. पुसट–हलणारीं–यांत्रिक–तेथें नुसते चेहरेच दिसत होते. पण त्यांची ओळख म्हणून पटत नव्हती. ती मुळीं माणसें होतीच कुठं ? त्या होत्या नुसत्या कळसुत्री बाहुल्या ! नुसती यंत्रें !

घड्याळाच्या अंतरंगांतल्या बारीक बारीक यंत्रांकडे पाहतां पाहतां जीव गुदमरून जावा, तसा माझा जीव गुदमरत होता. माझ्याहि डब्यांत गर्दी शिरत होती. त्या गर्दीकडे मी कंटाळलेल्या दृष्टीनें पहात होतों. गर्दीबरोबर गोंगाट डब्यांत शिरत होता, माणसांच्या शरीरांचे गंध डब्यांत शिरत होते. माझा जीव आणखी गुदमरत होता. आणखी कंटाळत होता. ही काय माणसं होतीं ? ह्या तर नुसत्या कापडानें मढविलेल्या मातीच्या बाहुल्या होत्या. आणि ह्या बाहुल्या एकमेकांना रेटत होत्या. धक्के मारीत होत्या. माझा डबा भरून जात होता. माझ्यासमोर एक जागा रिकामी होती. त्या जागेकडे एक छोटेसे भावले झटपट चालत आलें. गुदमरलेल्या वातावरणांत लव्हेंडरच्या सुवासाची एक लकेर उठली. मी सहज वर पाहिलें. तें भावले जागेवर बसले न बसले तोंच ते तेथून उठलें. उठून उभे राहिलें. उभे राहिले व कडेला सरले. आपली जागा त्यानें रिकामी केली. एका लठ्ठ, कुरूप, गरोदर, पस्तीशींतल्या स्त्रीसाठीं त्यानें आपली जागा सोडली. वागतात–वागतात ! कांहीं भावलीं अशीही वागतात !

कुरूप, गरोदर, लठ्ठ आणि पस्तिशीतलीही असेल ! पण अखेर ती स्त्री होती ! कुठल्याही स्त्रीला हा भलेपणा कांहीं माणसे दाखवीत असतात. मी डोळे उघडून क्षणभर वर पाहिले. ते भावले छोटेसे तर होते. सरासरी पांचफूट तीन इंच उंचीचे, किरकोळ देहयष्टीचे, फिकट गोऱ्या वर्णाचे, अंगांत शुभ्र सूट, डोक्यावर टोपी, हातांत ब्रीफ केस...वय ? त्या भावल्याचे वय काय असेल ! वयाचा अदमास करणें जरा कठीण होते. कुणाकुणाचे निश्चित वय ओळखणें कठीणच जाते. त्या भावल्याच्या चेहऱ्यावर मिशा नव्हत्या. चेहरा स्वच्छ होता. हनुवटीखालीं एखादी सुरकुती दिसत होती. वय असेल सरासरी पन्नास. पण त्याचे वय पन्नास असेल का ? उड्या मारणाऱ्या एखाद्या साळुंकीसारख्या त्याच्या हालचाली होत्या. झटपट आणि तरीहि कोवळ्या. तर मग त्याचें वय काय असेल ?—मी त्याच्या डोळ्यांकडे पाहिलें. आणि तेथें माझी दृष्टि रेंगाळली. फिकट निळ्या मण्यांप्रमाणें त्याचे बारीक डोळे लुकलुकत होते. एखाद्या जुन्या भिंगाप्रमाणें ते दिसत होते. त्या डोळ्यांनीं जणूं पुष्कळ जग पाहिलें होतें. थकव्याची विरळ धूळ त्या कांचेच्या डोळ्यांवर सांचली होती. तरीही ते डोळे



अनुक्रमणिका

जिवंत दिसत होते, सखोल दिसत होते, फिरत होते, आणि तरीहि संथ होते !

असतात असतात, कांहीं माणसें अशीहि असतात ! तीं कुरूप व लठ्ठ बायकांना जागा करून देतात. पन्नाशी उलटल्यावर त्यांना कुठलीहि बाई दाक्षिण्याचा विषय वाटूं लागते. त्यांतलाच हाहि एक असेल ! पस्तिशीतल्या कुरूप बाईवर उपकार करणारा, तिच्यासाठीं जागा सोडणारा, तिचं मूल खांद्यावर घेणारा आणि तिचं सामान खालीं उतरून देणारा !

—कारण त्या दिवशीं त्यानें हे सारे केले होते. ते मी पाहिले, व माझ्या ध्यानांतून गेले. पण मग मी वारंवार हेच पाहिले. असेच कांहीं तरी पाहिले. कांहीं ठरीव गाड्यांवर जाता-येतांना तो मला दिसत असे. तसाच साळुंकीसारख्या झटपट, झटपट उड्या मारीत तो डब्यांत येई. लव्हेंडरच्या सुवासाची झुळूक पेरत जाई, आणि कुणाला तरी आपली जागा रिकामी करून देई, जणूं कुणाला तरी देण्यासाठींच त्यानें आपली जागा धरलेली असे. जणूं पहिल्या वर्गाची प्रवास-पत्रिका त्यानें उभ्यानें प्रवास करण्यासाठींच घेतली होती. कारण कुणा ना कुणासाठीं तो उभा होत असे व आपले आसन दुसऱ्या कुणाला देत असे. एकदां एका संधिवात झालेल्या म्हाताऱ्याला त्यानें आपलें आसन दिलें. एकदां एका आठ-दहा वर्षांच्या मुलाला दिले. एकदां पहिल्या वर्गाचे तिकीट न घेतां पहिल्या वर्गानें प्रवास करणाऱ्या एका जख्ख कोळणीसाठीं त्यानें जागा रिकामी केली. त्याचे आसन आनंदानें घेणारे लोक त्याला नेहमीं भेटत. व नेहमीं तो त्यांना आनंदानें आपले आसन देत असे.

होय हे सारे तो मोठ्या साहजिक आनंदानें करीत असे. आणि नेहमीं आनंदानें करावी इतकी सोपी ही गोष्ट मला वाटत नव्हती. एका पायावर, दीड पायावर, अंग अवघडून कुणा ना कुणासाठीं तो उभी तपश्चर्या करीत असे. आपण कांहीं विशेष केलें असा गर्वहि त्याचे ठिकाणीं दिसत नसे, अगदीं सहजगत्याच कुणासाठीं तरी तो उठून उभा होई. व उभ्या उभ्याच कसलें तरी पुस्तक वाचूं लागे.

एके दिवशीं त्यानें अशीच कुणाला तरी जागा करून दिली. एव्हांना माझें त्याच्याविषयींचें कुतूहल जागे झाले होते. तो आतां मला केवळ गर्दीतला एक चेहरा वाटत नव्हता. त्या चेहऱ्याआडून एक माणूस डोकावतांना मला दिसत होता. त्या माणसाची ओळख पटावी, नांवगांव कळावें असें मला वाटूं लागलें होतें.

" ते कोण आहेत हो ? " मी शेजारच्या माणसाला विचारलं.

" कोण ते ? " शेजाऱ्यानें मला विचारलें.

" ते पांढऱ्या सुटातले. "

" ते तपस्वी ! "

" तपस्वी ! "

" होय त्यांचं आडनांव तपस्वी. "

" ते काय करतात ? "

" कुणास ठाऊक ! त्यांना कुणीतरी तपस्वी म्हणून हांक मारतांना मी ऐकलं म्हणून मला त्यांचं नांव ठाऊक. ते काय करतात तें मला ठाऊक नाहीं. "

मी तपस्वी नांवाच्या त्या माणसाकडे पाहिलं. तपस्वी तसेच अवघडत वाचत उभे होते. पण वाचत असतांनासुद्धां त्यांच्या शेजारीं आलेल्या लंगड्या भिकाऱ्याकडे लक्ष होते. सहज त्यांनीं खिशांत हात घातला, आणि भिकाऱ्याच्या वाटींत मोड टाकली. ती मोड आठ-बारा आण्यांची तरी असेल. मोड त्यांनीं मोजली नव्हती. त्यांचं वाचन चालूच होतं. अगदीं सरावातली गोष्ट आपोआप करावी, तसं त्यांनीं तें दान केलं. मी श्री. तपस्वी ह्यांच्याकडे आपादमस्तक पाहिलं. त्यांचा देह किरकोळ होता कपडे स्वच्छ होते, पण विशेष मूल्यवान नव्हते. आणि त्यांचे निळसर डोळे संथपणें लुकलुकत होते. अवघडत ते तसेच उभे होते. मला काय वाटलं कुणास ठाऊक पण मी त्यांना हांक मारली, " अहो तपस्वी. "

तपस्वींनीं इकडेतिकडे पाहिलं. मी त्यांना खूण करीत म्हटलं, " इकडे इकडे. "

तपस्वी माझ्याजवळ आले व नम्रपणें म्हणाले, " काय ? "

मी उठून उभा राहिलों व म्हणालों, " ह्या माझ्या जागेवर आपण बसा. "

" नको नको. " संकोचानें तपस्वी म्हणाले.

" कां ? " मी विचारलं.

" दोन घटकांचा तर प्रवास आहे. जरा उभं राहिलं तर काय बिघडतं ? "

" तेच मी म्हणतों आहे. " मी म्हणालों, " आतां दोन घटका मी उभा राहतों, आपण बसा. "

" नाहीं नाहीं. "

" का नाहीं ? आपण लोकांना नेहमीं आपली जागा देतां. आपल्याला कुणी जागा देत नाहीं. "

" आपण देतां आहांत कीं. "

" पण आपण ती घेत नाहीं. "

" मिळाली. आपण देऊं केलीत तेव्हांच मला आपली जागा मिळाली. बसा आपण. "

" नाहीं आपण बसा. "

" नको नको. "

आम्हीं दोघे एकमेकांना बसण्याचा आग्रह करीत असतांच बारा-तेरा वर्षांचे एक पोर माझ्या जागेवर येऊन बसले.

" ऊठ. " डोळे वटारीत मी त्याला म्हणालों.

" त्याला का उठवतां ? " तपस्वी मला विचारीत होते.

" माझी जागा मी तुमच्यासाठीं रिकामी केली होती, त्याच्यासाठीं नव्हे. " मी तीव्र स्वरांत उत्तर केलें.

" तर मग तुम्ही मला दिलेली जागा मी त्या मुलाला दिलेली आहे असें तुम्हीं समजा. "

कांहीं क्षण मी तपस्वींकडे पाहातच राहिलों. मला त्यांचे हें तत्त्वज्ञान नीटसें पटत नव्हते. मी अप्रसन्न स्वरांत म्हणालों, " तें पोर चांगलें धडधाकट आहे. तुमचे वय काय त्याचें काय ! "

" माझी सुद्धां प्रकृति तशी कांहीं वाईट नाहीं. " तपस्वी उद्‌गारले.

" आपलें वय काय ? "

" हें मला सत्तरावें वर्ष चालू आहे. "

अनुक्रमणिका






" सत्तर ! " मी आश्चर्यानें विचारलें. तपस्वी सरासरी पन्नाशीचे दिसत होते.

" हो मला सत्तरावं वर्ष चालू आहे. "

" तर मग ह्या पोरानें तुम्हांला जागा दिलीच पाहिजे. " मी त्या पोराचें वखोटें धरलें.

" नाहीं हो ! " मला दूर करीत तपस्वी म्हणाले, " आमच्या सारख्या म्हाताऱ्यांनीच पोरांसाठीं जागा केली पाहिजे. "

" आणि पोरांनीं वडिलधाऱ्यांसाठीं जागा करायला नको ? " मी विचारलं.

" करतील करतील. " तपस्वी उत्तरले, " त्यांची वेळ आल्यावर तीहि कुणासाठीं जागा करतील. "

तपस्वींचे धुरकट निळे डोळे चितळले. त्यांचे टाणें आलें आणि मला नमस्कार करून तपस्वी निघून गेले. त्या दिवसापासून माझी आणि तपस्वींची ओळख झाली. त्यांची मी वाट पाहूं लागलों. त्यांना मी जागा देऊं लागलों. मी दिलेली जागा ते आणखी कुणाला देत व परोपकाराचें पुण्य माझ्या पदरांत बांधीत. मग मी व तपस्वी दोघेही उभ्या उभ्या गप्पा मारीत असूं. स्वतःविषयीं तपस्वी आपण होऊन बोलत नसत. बोलत ते फार नम्रतेनें बोलत. पण मी तपस्वी ह्यांचे-विषयीं मिळवितां येईल तेवढी माहिती मिळवीत होतों. ती माहिती ऐकून मला आश्चर्य वाटलें होतें, कौतुक वाटलें होतें, कांहींसा अविश्वासहि वाटला होता. ह्या प्रकारच्या गोष्टी आजहि जगांत घडत असतील ह्याची मला कल्पना नव्हती. मला मिळालेली माहिती खरी कीं खोटी हें मोठ्या चातुर्यानें मी रामभाऊ तपस्वींकडूनच पारखून घेत होतों.

एक दिवस तपस्वी गाडींत बरेंच कापडचोपड घेऊन शिरले. सुटीचा दिवस होता आणि गाडींत जागा होती. झटपट चालत ते माझ्यापाशीं येऊन बसले.

" आज बरीच खरेदी केलेली दिसते आहे रामभाऊ ? " मी विचारलं.

" होय " ते उत्तरले.

" झोकदारं साड्या घेतल्या आहांत ? "

" पोरींनां आजकाल अशाच साड्या आवडतात. अशाच साड्या आम्हाला हव्यात असें पोरींनीं मला सांगितले होते. "

" किती पोरी आहेत ? "

" तीन. "

" आणि हें शर्टिंग कुणासाठीं ? "

" तें पोरांसाठीं. "

" पोरं किती आहेत ? "

" चार. "

" पोरं काय करतात ? "

" शिकतात. "

" आणि पोरी ? "

" त्याही शिकतात. "

" त्यांची लग्नकार्य करणार कीं नाहीं ? "

" करूं कीं, पण पोरं म्हणतात, काका आम्हीं खूप शिकणार. "

" तुमचीं पोरं तुम्हांला काका म्हणतात ? "

" हो. मी त्यांचा काकाच आहे. "

" म्हणजे त्यांचे वडील—? " मी चाचरत थबकलों.

" हो ते माझे धाकटे बंधु. शाळेंत शिक्षक आहेत. देशीविदेशी चळवळींत त्यानं मोठ्या पगाराची चाकरी सोडली. मोठ्या छातीचा माणूस. कधीं त्यानं पैशाचा लोभ धरला नाहीं. तुरुंगांत जायला भ्याला नाहीं. त्याच्या हातून कांहीं मोटं काम आयुष्यांत घडलं. नाहींतर आम्हीं ! "

तपस्वी स्वतःकडे कमीपणा घेत होते आणि आपल्या भावाला मोठेपणा देत होते. मी त्यांच्याकडे पहात विचारलं.

" तुमचं काय चुकलं ? "

" आम्ही बसलों आहोंत पैसा एके पैसा करीत. "

" किती पैसे मिळवतां तुम्हीं ? "

" असेच आपले सहस्र अकराशें. "

" आणि ह्या पैशाचं तुम्ही करतां काय ? "

" पैशाचं काय करायचं ! पैसा वेंचतो. "

" कुणासाठीं ? "

" आमच्याचसाठीं " तपस्वी मान खालीं घालून म्हणाले.

" तुम्हांला मुलं किती ? "

" सात. "

" तुमच्या बंधूनाही सात मुलं आणि तुम्हांलाही सातच मुलं ? "

" तसं नव्हे. माझ्या भावाची मुलं तीच माझी मुलं. "

" तुम्हांला मुलं नाहींत ? "

" भावाची मुलं आहेत ना ! मग माझी वेगळी मुलं कशाला ? "

" पण तुम्ही लग्न तर केलं असाल ! "

" नाहीं. "



रेडिओ सप्ताहांतील नवकाव्याचें व्यवच्छेदन !

अनुक्रमणिका

"तुम्ही लग्नच केलं नाहींत ! वयाची सत्तर वर्षे तुम्ही तसेच राहिलांत !"
"हो."
"कां बरं ?"
"राहिलो झालं."
—आणि एवढें बोलून तपस्वी आपल्या ठाण्यावर झपझप उतरून गेले. मी त्या मूठभर माणसाच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहात राहिलो. तर मग मी ऐकले ते खरे होते. तपस्वी आपल्या देशभक्त भावाचा संसार करीत होते. त्यापूर्वी त्यांनीं आपल्या बहिणींचीं लग्नं केलीं होतीं. एका ओढगस्त बहिणीचा संसार ते आजही चालवीत होते. तपस्वी दुसऱ्यांचेच संसार करीत होते. स्वतःचा संसार त्यांनी कधीं मांडलाच नव्हता. मासिक सहस्र अकराशें मिळकत करणारा हा माणूस आजवर फटिंग राहिला होता, आजन्म त्याग करीत आला होता. आणि त्याच्या त्या अबोल त्यागाची कुठें सार्वजनिक नोंद नव्हती, बोभाटा नव्हती, प्रसिध्दी नव्हती. मिनिटभर थांबलेली गाडी चालू झाली आणि तपस्वींची आकृति गर्दीत मिसळून गेली. तपस्वीविषयीं विचार करीत असतांच पुन्हां ते मला गाडींत भेटले. ह्या खेपेला त्यांच्या हातांत दोन तीन छत्र्या होत्या व दोन तीन पाणकोट होते.
"कुणासाठीं हे पाणकोट तपस्वी ?" मी विचारलं. "तुमच्या पुतण्यासाठीं ?"
"नाहीं."
"मग ?"
"आमच्या शेजारीं दोन विद्यार्थी राहतात."
"बरं मग ?"
"बिचारे निर्धन विद्यार्थी आहेत. चांगले होतकरू आहेत. आतां हा पावसाळा डोक्यावर आला. ती पोरं बापडी भिजत शाळेला जातात."
"त्यांना तुम्ही हे पाणकोट देणार ?"
"होय."
"तुमचे उपकार ती मुलं पुढें स्मरतील ?"
तपस्वींचे निळे डोळे लुकलुकले. ते कांहींच बोलेनात. मी त्यांना डिंवचून पुन्हां म्हणालों 'तुम्ही जे कांहीं त्या मुलांसाठीं करीत आहांत तें त्यांच्या ध्यानांत राहील ?"
तपस्वींनी माझ्या प्रश्नाचें वेगळेंच उत्तर दिलें. ते म्हणाले,
"आज तर त्या बिचाऱ्यांचे पावसापासून निवारण होईल ! त्या कोवळ्या पोरांनीं वाऱ्यापावसांत भिजत जावं आणि आपल्या डोक्यावर छत्र्या असाव्यात—मनाला बरं नाहीं वाटत."
"तर मग तुमच्या मनाला बरं वाटावं म्हणून तुम्हीं हें सारं करतां ?"
"अगदी खरं."
"केवळ परोपकार म्हणून ?"
"ह्यांत परोपकार कसला ? स्वतःसाठींच आपण हें करायचं असतं."
तपस्वींचें वाक्य मनांत घोळवीत क्षणभर मी चपापून थांबलों. मग सिगारेटचे पाकीट त्यांचे पुढें धरीत म्हणालों, "घ्या सिगारेट घ्या."
"नको."
"तुम्हीं कधी सिगारेट ओढत नाहीं ?"
"पुष्कळ ओढत असे."
"मग ?"
"बरींच वर्षे झालीं सोडली."
"कां ?"
"माझ्या बहिणीचे यजमान घशाचा कॅन्सर होऊन वारले, डॉक्टरांचं मत पडलं कीं त्यांना हा कॅन्सर सिगरेटमुळें झाला. तेव्हांपासून माझ्या बहिणीला सिगरेट नुसती डोळ्यासमोर खपत नाहीं."
"कुठं आहेत त्या ?"
"इथंच आहेत. माझ्या भावाकडे."
"तर मग तुम्ही आपल्या बहिणीसाठीं सिगरेट सोडलीत !"
डोळ्यांत पाणी आणून सिगरेट सोडण्याविषयीं विनवण्या करणाऱ्या माझ्या बायकोचे स्मरण होऊन मी उद्‌गारलों,

---

## जहांगीर



### चित्रकला

आज अबू-ई हसन यानें माझ्या दरबाराचें एक सुरेख चित्र रंगवलें आणि मला नजर केलें. हें चित्र त्यानें 'जहांगीर नामा'चें मुखपृष्ठ म्हणून तयार केलें. चित्र खरोखरच प्रशंसनीय असल्यामुळें मी त्याची खूप वाहवा केली. तो कसबी चित्रकार होता आणि त्याच्या तोडीचा दुसरा चित्रकार त्या काळांत तरी नव्हता. आज अबु-ई दाई, आणि विदजाद सारखे थोर चित्रकार हयात असते तर त्यांनीं त्याचें कौतुक केलें असतें. अबू-ई हसनचा बाप अका-राझा हा माझ्या उत्तम परिचयाचा. त्याला मुलगा झाला माझ्याच घरीं. त्याच्या मुलाला मी चांगलं शिक्षण दिलं. आज तो पहिल्या प्रतीचा चित्रकार झाला आहे.

मला चित्रांची फार आवड आहे आणि त्यांत मी तज्ञ आहे. चित्र पाहून हें कलम कोणत्या कलावंताचं हें मी बिनचूक सांगूं शकतो. अनेक चित्रसमुदायांतून मी अशीं चित्रें आणि त्यांचे चित्रकार सहज ओळखून काढूं शकतो. एकच चित्र अनेक चित्रकारांनीं पूर्ण केलं असलं तर कोणता भाग कोणत्या चित्रकारांनीं पूर्ण केला आहे हे मी चटकन् सांगूं शकतो. • •

### धूम्रपान

धूम्रपानाचा अनेक लोकांच्या प्रकृतीवर आणि मनावर विपरीत परिणाम होतो, त्यामुळें मी धूम्रपानाला बंदी घातली आहे. माझा भाऊ शाही अब्बास याला धूम्रपानाचे काहीं परिणाम माहित असल्यामुळें त्यानें इराणांत यावर बंदी घातली आहे. पण खान इ आलम याचें धूम्रपानाचें व्यसन सुटणेंच शक्य नाहीं.



अनुक्रमणिका

" फार मोठे आहांत तुम्ही तपस्वी ! फार मोठे आहांत ! "

" नाहीं–नाहीं. " मोठेपणाचा तो आरोप झटकून टाकीत तपस्वी मान खालीं घालीत म्हणाले, " मी सिगरेट ओढत नाहीं, पण प्रति-दिवशीं थोडीशी दारू घेतों. "

" तुम्ही दारू घेतां ? "

" होय. "

" किती घेतां ? "

" घेतों एक ते दीड पेग. गेलीं कित्येक वर्षे नियमीत प्रत्येक सायंकाळीं मी एक ते दीड पेग व्हिस्की घेत आलों आहे. तसा मी निर्व्यसनी माणूस मुळींच नाहीं. "

" तुम्ही कधीं धुंद होत नाहीं ? "

" नाहीं. "

" दीड पेगची मर्यादा कधीं ओलांडीत नाहीं ? "

– " नाहीं. "

" तर मग तुम्ही व्यसनी नाहीं. तपस्वी आहांत. व्हिस्कीचा आस्वाद घेणं, आणि तरीहि तिच्या आहारी न जाणं ही फार मोठी तपश्चर्या आहे. अजिबात दारू न घेण्यापेक्षां खरोखर हीच तपश्चर्या जास्त कठीण आहे.

मोहाला सामोरी जाणं आणि मोह जिंकणं; मोठी––फार मोठी गोष्ट तुम्ही करीत आहांत तपस्वी. "

" नाहीं नाहीं " माझ्या स्तुतीनं मनःपूर्वक संकोचून पंजे हालवीत तपस्वी म्हणाले, " मी कुठलीहि मोठी गोष्ट करीत नाहीं. संध्याकाळीं मला जरा थकल्यासारखं होतं. पेग दीडपेग व्हिस्की घेतली म्हणजे जरा बरं वाटतं. हा एक प्रकारचा दुबळेपणाच आहे. तसा मी दुबळाच मनुष्य आहे––दुबळाच आहे. कांहीं कांहीं मोह मलाहि आवरतां येत नाहींत. "

" कुठले मोह तपस्वी ? "

तपस्वींचा चेहरा लाल झाला, आणि ते घाईघाईनें म्हणाले,

" बोलूं––बोलूं केव्हांतरी ! "

आणि घाईघाईनें ते उठून उभे राहिले.

त्यांनीं खिशांत हात घातला आणि समोरच्या भिकाऱ्याला चार-सहा आण्यांची मोड दिली. गाडी थांबली आणि रुमालानें चेहरा पुसत तपस्वी झपझप निघून गेले. ते दिसेनासे झाले तेव्हां ते रुमालानें चेहरा पुसतच होते. त्यांच्या मनांत कसली तरी कालवाकालव चालू होती. गाडी चालू झाली आणि तपस्वी दिसेनासे झाले. सहजच मी ते बसले होते त्या जागेकडे पाहिलें आणि दचकलों. तेथें एक टपालाची पावती पडली होती. ती पावती शंभर रुपयांच्या द्रव्याज्ञेची होती. फोरास-रोडवरील मलकाजानच्या नांवें ते द्रव्य पाठविलें गेलें होतें. त्या पावतीवर वेड्यावांकड्या व कापऱ्या अक्षरांत तिची स्वाक्षरी केलेली होती. मी त्या स्वाक्षरीकडे पहातच राहिलों. लिहिण्या वाचण्याचा फारसा सराव नसलेल्या स्त्रीचें तें अक्षर होतें. तें अक्षर काढणारी व्यक्ति बहुधा वयस्क देखील असावी. कापऱ्या व ढोबळ अक्षरांत तिनें अक्षरें काढली होती. " मलकाजान मुरादाबादी. " तर मग रामभाऊंच्या आयुष्यांत हेहि एक प्रकरण होतं तर, ह्या तपस्वी मुनीला एक मेनकाहि भेटली होती म्हणायची ! ही मेनका फोरासरोडवरची होती. आणि रामभाऊ तिची अगदीं आजदिनाका-पर्यंत संभावना करीत होते. हे सारे का घडले असेल ? कसें घडलें असेल ? तपस्वीचे कपडे किती साधे होते ! चेहरा किती निर्विकार होता ! वृत्ति किती सात्विक होती ! किती सदय होती ! तर मग काय रामभाऊ हे एक मुरलेले पापी होते ! अव्वल प्रतीचे ढोंगी होते ? कसबी नट होते ? छेः छेः हे अनुदार विचार माझ्या मनांत नुसते निसटते येणेंहि योग्य नव्हतें. माणसांना आपण खरोखर किती कमी ओळखतों ! आपण त्यांचे नुसते चेहरे पाहतो. माणसांची गर्दी म्हणजे नुसते चेहऱ्यांचे चिकट पुस्तक. त्यांचं मन आपणाला कुठें ठाऊक असतें ? त्यांचीं सुखदुःखें, त्यांच्या वेदना, त्यांचे संदेह, त्यांच्या समस्या, ह्यांची आपणाला कुठें ओळख असते ? कुठें जाणीव असते ? ह्या रामभाऊ तपस्व्यांना तरी प्रथम मी कुठें ओळ-खत होतों ? तेहि केवळ गर्दीतले एक म्हणूनच प्रथम मी पाहिले आणि मग त्यांना ओळखूं लागलो. पण मग तरी मी त्यांना खरोखर ओळखूं लागलों का ?

मी हातांतल्या त्या पावतीची हळुहळू घडी केली व काळजीपूर्वक ती माझ्या चामचंचींत ठेवून दिली. आणि मग येत्या जात्या गार्डीत प्रतिदिवशीं त्यांची वाट पाहूं लागलों.

बरेच दिवस तपस्वी मला भेटले नाहींत आणि मग एके रात्रीं सरासरी अकराच्या सुमारास ते तसेच साळुंकीसारख्या उड्या मारीत गार्डीत चढले. डब्यांत चार-दोनच माणसें होतीं व ती दूर दूर बसली होती.

" या तपस्वी " मी किंचित् सरकलो व तपस्वींना माझ्या शेजारी जागा करून दिली. तपस्वींनी रुमालानें चेहरा टिपला. त्यांच्या निळसर डोळ्यांत एक लकाकी होती व चेहऱ्यावर लाली होती. त्यांच्या श्वासांत एक मंद गंध होता. तो गंध व्हिस्कीचा होता.

" आज इतक्या रात्रीं ? "

" होय. "

" बरेच दिवस दिसला नाहींत ! "

" मी वेगळ्या गाड्यांनीं जात होतों. "

" कां ? "

" जरा दुखण्याबाण्यांत गुंतलो होतों. "

" तुमच्या घरीं कुणी आजारी आहे ? "

" नाहीं. "

" मग कोण कुठें आजारी आहे ? "

" फोरासरोड. "

" फोरासरोड ? " मी घाई-घाईनें खिशांत हात घातला व तपस्वींना विचारलें, " तुमचं कांहीं हरवले आहे ? "

" नाहीं. " श्वास सोडीत तपस्वी म्हणाले, " माझे कांहीं हरवलेले नाहीं. " आणि मग हळूच ते बाकाला टेकले. तो तुडतुडीत माणूस आज प्रथमच ह्यारीतीनें आधार शोधीत होता. आज प्रथमच बाकाला टेकत होता. आज प्रथमच तो ह्याप्रकारें श्वास सोडत होता. त्याचे डोळे आज प्रथमच ओलसर दिसत होते.

" रामभाऊ " त्यांच्याकडे पहात मी म्हटलें, " पहा ही पावती तुमची आहे का "

" होय " शांतपणें पावती खिशांत घालीत रामभाऊ म्हणाले

अनुक्रमणिका






" बरे झाले ही पावती तुम्ही मला दिलीत. ही अखेरची पावती आहे. मलका ह्यापुढें पुन्हां कधीं पावतीवर स्वाक्षरी करील असें मला वाटत नाहीं. "

" ही मलका कोण ? "

" ती एक गाणारी आहे. "

" म्हातारी आहे ? "

" पासष्ट वर्षांची आहे. "

" तिला तुम्ही नियमाने पैसे देत होतात ? "

" छेः छेः!" तपस्वी आवेशानें हात हालवीत म्हणाले " मी तिला काय देणार ? तिच्या गाण्याचें मोल पैशाने कसे होणार ? तिने मला आनंद दिला, धीर दिला. एकेकाळीं तिला पैसा मिळत होता आणि मी निर्धन होतो. तेव्हां तिने मजकडून कांहीं घेतलें नाहीं. देऊ केलें तरी घेतले नाहीं. आज ती निर्धन आहे, आजारी आहे. आतां तिचें गाणेहि गेलें. पण मी मात्र तिचे गाणे ऐकत होतो. दर आठ दिवसांनी, एकदां.

" केवळ गाणे ऐकत होतात ? "

तपस्वींनीं सरळ माझ्या डोळ्याकडे पाहिले व ते दृढ स्वरांत म्हणाले, " होय. गेली पस्तीस वर्षे मी तिचे गाणे ऐकत आलों आहे. "

" केवळ इतकेच ? "

" इतकेच केवळ. "

तपस्वींचा स्वर तसाच दृढ होता. माझ्याकडे ते तसेच पहात होते. आतां माझी मान खालीं गेली व मी म्हणालो, " तपस्वी तुम्ही मोठे आहांत. खरोखर मोठे आहांत. तुम्ही मन जिंकलं आहांत, तुम्ही स्वार्थ जिंकला आहांत. "

" नाहीं. " तपस्वी उचंबळून उत्तरले " मी मन जिंकलेलं नाहीं, मी स्वार्थ जिंकलेला नाहीं. " तपस्वी आपली ब्रीफ केस उघडत होते. त्या ब्रीफकेसमध्यें एक पाकीट होतें. कापऱ्या हातांनीं त्या पाकीटांत तपस्वींनी मलकाजानची पावती ठेवून दिली व मग ते पाकीटच त्यांच्या हातांतून गळून पडले. मी पहातच राहिलो. त्या पाकिटांतून एका सुंदर तरुणीचे छायाचित्र बाहेर आले, ते छायाचित्र जुने असले पाहिजे; जुन्या काळचे असले पाहीजे. छायाचित्रांतील त्या तरुणीनें लांब बाह्याचें पोलके घातले होते. ती नऊवारी इरकली लुगडे नेसली होती. तिच्या पायांत पुणेरी जोडे होते व तिच्या कपाळावर कुंकूं नव्हते. ते चित्र तसेच खाली पडले होते. व त्या चित्राशेजारींच पडली होती मलकाजानची पावती. तपस्वी त्या दोन्हीं वस्तूंकडे नुसते पहात होते व म्हणत होते " मी दुबळा आहे ! मी दुबळा आहे ! "

बरेच वेळां माझ्या ओठापर्यंत आलेला प्रश्न ह्यावेळीं अकस्मात बाहेर पडला. त्या छायाचित्राकडे पहात मी विचारलें " रामभाऊ तुम्हीं कधी लग्नाचा विचार केला होता ? "

" केला होता. " मान हालवीत तपस्वी म्हणाले.

" कुणाशीं ? "

क्षणभर थांबून तपस्वी खालीं वाकले, आणि ती पावती व ते छायाचित्र समोर धरीत म्हणाले,

" हिच्याशीं. "

" ह्या कोण होत्या ? "

" एक विधवा होती—बालविधवा होती. तिच्याशीं माझें लग्न ठरलें होतें. त्या जुन्या गोष्टी आहेत. चाळीस पंचेचाळीस वर्षांपूर्वी माझें लग्न ठरलें होतें. "

मी एकदां व्यग्रपणानें श्री. तपस्वी ह्यांचेकडे पाहिलं व पंचेचाळीस वर्षांपूर्वी तरुण तपस्वी कसें दिसत असतील, नवरदेव म्हणून ते कसे दिसले असते ह्याची कल्पना करून पाहिली. नंतर मी विचारलें, " तर मग तें ठरलेलें लग्न कां झालें नाहीं ? "

" तशी विधिघटना नव्हती. " तपस्वी पुन्हां बाकाला टेकत म्हणाले, " माझें लग्न ठरलें आणि त्याच सुमारास माझी वहीण विधवा झाली. तिच्या पदरीं पांच पोरें होतीं. माझ्या लहानपणीं ह्या माझ्या वहिणीनें माझे कष्ट काढले होते. पोरकेपणीं तिनें माझ्यावर केलेले उपकार मला विसरतां येत नव्हते. "

" म्हणून वहिणीचा संसार संभाळण्यासाटीं तुहीं स्वतःचा संसार सोडलांत ! "

" छेः छेः मी कांहींच सोडलें नाहीं. माझ्या वहिणीनें माझ्यासाटीं फार गोष्टी सोडल्या होत्या. "

" आणि मग ह्या बाईचें काय झालें ? " मी त्या सुंदर तरुणी-कडे बोट दाखवीत विचारलें.

तपस्वींनीं आणखी एक उसासा सोडला, ते बाकावर आधिक टेकले व म्हणाले, " ती गेली. "

" म्हणजे ? "

" आमचे ठरलेले लग्न मी मोडले. मला वाटलें ती दुसऱ्या कुणाशीं लग्न करील. एरवीतेवीं आमचा कांहीं प्रेमविवाह नव्हताच. ठरवलेले लग्न होतें. दुसरें लग्न करायला ती मोकळी होती. पण प्रत्यक्षांत तसें घडलें नाहीं, आमचं लग्न मोडतांक्षणींच ती आजारी पडली व त्यांतच तिचा शेवट झाला. मला वाटतें मानसिक धक्क्यानें ती गेली. तिला मारणारा माणूस मी. " तपस्वींनीं स्वतःच्या छातीवर बोट टेकलें.

" नाहीं नाहीं. " मी म्हणालों, " तसें कशावरून ? तुम्ही कां स्वतःला दोष देतां ? "

" दोषी मीच आहे. मी दुबळा आहें. मला मोह पडतो. ह्या तिच्या चित्राचा मोह मला पडलेला आहे. गेली पंचेचाळीस वर्षें हें चित्र मी जवळ बाळगलें आहे. तिला मी सोडलें व तिचें चित्र मात्र जवळ बाळगलें ! मी अशक्त आहे ! स्वार्थी आहे ! "

" छेः छेः ! " उत्तेजित स्वरांत मी उद्गारलों. " तुम्हीं स्वार्थ खरोखरी सोडलांत. वहिणीला आधार तुम्ही दिलात. साऱ्यांना आधार दिलात. "

" आणि तिचा आधार काढून घेतला. ती गेली आणि मग मला मलकानें आधार दिला. आतां मलकाहि चालली. मला वाटतें आतां मीहि लवकरच जावें हें बरें. आणि मी लवकरच जाणार. मला आतां कशाची चिंता नाहीं. सगळे आपापल्या मार्गावर आहेत. "

त्यांना मार्गावर ठेवणारे तुम्हीं आहांत तपस्वी ! खरोखर तुम्ही फार मोठे आहांत. "

" नाहीं नाहीं ! मी फार लहान आहें, फार दुबळा आहे. मला वाटतं आतां जास्त दिवस मी टिकणारसुद्धां नाहीं आणि टिकूं पण नये. "







अनुक्रमणिका

आज प्रथमच तपस्वीचे डोळे ओलावत होते त्यांच्या डोळ्यांतून आतांहि अश्रू गळत नव्हते. पण आतां अश्रूंच्या अदृश्य अर्कानेच जणूं त्यांचे ते निळसर डोळे रंगले होते व ओलावले होते. मी एका उमाळ्यासरशीं त्यांचे हात घट्ट धरले व म्हणाले, "हे पहा रामभाऊ, तुम्हीं कृपा करून मरणाच्या गोष्टी बोलूं नका. तुमच्या इतकी हळवी, दयाळू आणि त्यागी माणसं पुन्हां आम्हीं आणायची कुठून ? आज आपला समाज अगदीं दरिद्री बनला आहे रामभाऊ, अगदीं दरिद्री बनला आहे. तुमच्यासारखी माणसं हेंच आमचं खरं बळ आहे. आम्हीं जगतो खरोखर तुमच्यामुळेच. कुठलाहि समाज तुमच्यासारख्या माणसांच्या पुण्याईवरच जगत असतो. तुमचं पुण्य कुणाला ठाऊक असो, कुणाला ठाऊक नसो पण ते आपलं कार्य करून जातं. तुमच्यासारखी माणसं गेली, तर ह्या पुण्याची ओळख आम्हीं तरूण पोरांना अशी करून द्यायची ? रामभाऊ तुमची माझी ओळख नुसत्या ह्या गाडींतली आहे. दोन घटकांची तुमची माझी सोबत असते. आजवर कधी मी तुमच्या घरीं आलो नाहीं, कीं तुम्हीं माझ्या घरीं आलां नाहींत. आपण नुसते गाडींत भेटतों. पण मला वाटतं जोपर्यंत ही गाडी आहे तोपर्यंत ह्या गाडींत तुम्हीं असायलाच पाहिजे ! तुमच्याविना ही गाडी चालणारच नाहीं रामभाऊ ! इथें ही बाकीची गर्दी पुष्कळ आहे. पण इथें तुम्ही पाहिजेच."

मी बरेच कांहीं बोलून गेलों होतों. गाडीच्या ध्वनीबरोबर मी बोलत होतों. मग गाडी थांबली. माझें बोलणेही थांबलें. बाकाचा आधार घेऊन रामभाऊ उठून उभे राहीले. त्यांनीं माझा हात दाबला व ते म्हणाले "येतो आतां आमचं ठाणं आलं."

"आज तुम्ही फार थकलेले दिसता रामभाऊ."

"हा प्रवास असाच थकवणारा आहे बाबा." रामभाऊ गूढपणें हंसले. त्यांनीं माझा हात पुन्हां एकदां दाबला आणि ते दिसेनासे झाले.

दोनच दिवसांनीं तपस्वी अस्वस्थपणें पुन्हा एकदां माझ्या शेजारीं बसलेले होते. त्यांचा चेहरा उतरलेला होता आणि ते कांहींसे थकलेले दिसत होते.

"प्रकृति बरी नाहीं का रामभाऊ ?" मी विचारले.

"बरी आहे कीं" रामभाऊनी उत्तर दिलें. "पण आज मी जरा एका काळजींत आहे."

"काळजी ?" मी आश्चर्यानें विचारलें. काळजीचा उल्लेख आज रामभाऊ प्रथमच करीत होते. "कसली काळजी ?" मी त्यांना पुसलें.

"मला एक बाहुली हवी होती."

"बाहुली ?" मी रामभाऊना न्याहाळून पहात म्हणालों, "ह्या मुंबईत बाहुल्यांना हो काय तोटा ? शेकडों बाहुल्या तुम्हालां इथें मिळतील."

"पण नाहीं मिळत आहेत." चिंतातूर स्वरांत रामभाऊ उत्तरले. "मला हवी तशी बाहुली मला कांहीं कुठें दिसत नाहीं. सगळी मुंबई पालथी घातली."

"तुम्हाला कसली बाहुली हवी आहे ?"

"नाचणारी आणि टाळ्या वाजवणारी, आणि तोंडानें 'ऊं ऊं' असा स्वर काढणारी."

"मग मिळेल तुम्हांला तशी बाहुली. ही मुंबई आहे."

"तें खरं हो; पण ह्या मुंबईंत एकेकदां एकेका वस्तूंचा नुसता पूर येतो पण मग परत कांहीं ती वस्तु पुन्हां कुठें दिसत नाहीं, तसंच झालं आहे पहा ह्या बाहुलीचं. आणि पोरीनं तर नुसता त्या बाहुलीसाठीं नुसता आकांत मांडला आहे."

"कुठल्या पोरीनं ?"

"कौशीनं. आमच्या मोलकरणीची पोर आहे. भारी गोड पोर आहे पहा. कुठंतरी तिनं ती बाहुली पाहिली, आणि तिला ती हवीशी वाटली."

"मोलकरणीच्या पोरीला ?"

"मोलकरणीची असली म्हणून काय झालं हो ! अखेर ती पोरच आहे ना ?"

"अहो पण पोर असली म्हणून काय झालं ! मोलकरणीचीच आहे ना ?"

"हें पहा. पोरापोरांत कांहीं भेद नसतो. सारीं पोरंच असतात. पोरांनीं बाहुलीसाठीं हट्ट धरायचा नाहीं तर कुणी धरायचा ?"

"अहो पण रामभाऊ, इतक्या महाग बाहुलीसाठीं हट्ट ? ती बाहुली म्हटलं तरी पंधरावीस रुपयांची असेल."

"पोरांना कुठें रुपयांचा अर्थ कळतो ? तीं तुमच्यापाशीं रुपये का मागतात ! तीं मागतात बाहुली. आणि बाहुली मागण्याचा पोरांचा अधिकारच आहे. बाहुली मिळत नाहीं म्हणून कुठल्याही पोराच्या डोळ्यांत पाणी येतां कामा नये. त्याला बाहुली ही मिळालीच पाहिजे. मग ते दरिद्री माणसाचं पोर का असेना. मुलांची हौस पैशामुळें मारली गेली ना, तर मला तें अगदीं कसंसच वाटतं."

"म्हणून तुम्ही आतां बाहुली शोधायला निघालांत ?"

"होय."

"कौशीसाठीं बाहुली ?"

"होय. पण ती मिळते आहे कुठें ?"

रामभाऊ डब्याच्या दाराशीं गेले व परत येऊन म्हणाले, "नाहीं, इथेंही नाहीं दिसत कुणी फेरीवाला."

"फेरीवाल्यापाशीं तसली बाहुली मिळेल ?"

"मिळेल सुध्दां. ह्या मुंबईत कुठें काय मिळेल तें सांगतां येत नाहीं."

व्यग्रपणें तपस्वी खिडकीबाहेर पहात होते. गाडी धरधर करीत धांवत होती. मध्येंच ते उठून उभे राहिले व म्हणाले, "त्या पोरीचं रडणं सारखं मला ऐकूं येत आहे पहा, कसंहि करून मला ती बाहुली आज मिळविलीच पाहिजे ! पोरगी जेवत नाहीं, खात नाहीं, सारखी बाहुली—बाहुली म्हणून रडत आहे."

दुसरे ठाणें आले व रामभाऊ धांवत धांवत पुन्हां धक्क्यावर जाऊन आले. मग मान हालवीत ते म्हणाले, "नाहीं, इथेंही नाहीं तसली बाहुली."

"बसा रामभाऊ." मी त्यांचा हात धरून म्हणालो, "कां उगाच एवढा जिवाचा आटापीट करतां ? रडेल, रडेल आणि दोन दिवसांनीं ती पोर विसरून जाईल सारं."

"विसरेल सुध्दां," रामभाऊ हळहळत म्हणाले, "पण हे रडत

रडत एखादी गोष्ट विसरणं बरं नव्हे, न मिळाल्यामुळें विसरणं बरं नव्हे ! मिळाल्यावर विसरणं वेगळं, न मिळतां विसरणं वेगळं. लहान पोरांच्या भुका अशा मारल्या जाणं बरं नव्हे ! ''

पुन्हां रामभाऊ संचितपणें बसले. पुन्हां पुन्हां ते खिडकीबाहेर पहात होते, फलाटा-फलाटांवर खालीं उतरत होते व मान हेलावीत परत आंत येत होते. हवी ती वस्तू त्यांना सांपडत नव्हती.

" हें पहा रामभाऊ '' त्यांची ती धांवपळ असह्य वाटून मी म्हणालो " जगांत जितकीं पोरं आहेत तितक्या कांहीं बाहुल्या नाहींत. कुणाकुणाला म्हणून तुम्ही बाहुल्या देणार ? ''

" देतां येतील तितक्यांना '' रामभाऊ व्यग्रपणें उत्तरले. " पण काय करावं ? आज मला कुठें ती बाहुलीच दिसत नाहीं आणि त्या पोरीचा हट्ट तर मला अगदीं ऐकवत नाहीं. कसंहि करून मला ती बाहुली कौशीसाठीं घ्यायलाच पाहिजे. ''

" तर मग तुम्ही ती बाहुली कौशीसाठीं घ्याच. '' मी म्हणालों " आजपर्यंत तुम्ही सगळ्यासाठीं सगळें घेतच आलां आहांत आणि सगळ्यांना सगळं देतच आला आहांत ! ''

" छेः हो '' रामभाऊ मान झटकून म्हणाले '' लोकानींच मला कितीतरी दिलं आहे आणि आतां त्या पोरीसाठीं घेतां येत नाहीं. कौशीच्या आईनं आमच्या कुटुंबासाठीं किती खस्ता खाल्ल्या आहेत आणि तिच्या मुलीला एक साधं खेळणं मला देतां येऊं नये ! ''

" देतां येईल रामभाऊ '' मी गंभीरपणें उत्तरलों. " तुमची तपश्चर्या व्यर्थ जाणार नाहीं, तुमची तेवढी इच्छाच आहे तेव्हां तुम्हाला ती बाहुली मिळेल. ''

" पण आतां मधें एकच स्टेशन राहिलं आहे '' रामभाऊ चिंताग्रस्त स्वरांत म्हणाले.

" तर मग त्याच स्टेशनवर तुम्हाला ती बाहुली मिळेल. ''

आणि खरोखरच मला तसं वाटत होतं. कां वाटत होतं तें सांगतां येत नाहीं. पुष्कळशा गोष्टी माणसाला सांगतां येत नाहींत. पण मला निश्चयानं वाटत होतं कीं ह्या शेवटच्या ठाण्यावर रामभाऊंना हवं तें मिळणार. रामभाऊ खिडकींतून बाहेर पहात होते. स्टेशन जवळ येत होतें. बाहुटे मागें जात होते. स्टेशन अगदीं जवळ आलं तेव्हां रामभाऊ उठून उभे झाले व म्हणाले, " ती तोंडानें ऊं ऊं करणारी आणि टाळ्या वाजवत नाचणारी बाहुली इथें मला मिळेल असं तुम्हाला खरंच वाटतं का ? ''

" खरंच वाटतं. '' मी ठाम स्वरांत उत्तरलों. गाडी फलाटांत शिरली व गाडीचा वेग मंदावला. रामभाऊ झपझप चालत दाराशीं जाऊन उभे राहिले व तेथून ओरडले, " देव तुमचं भलं करो ! इथं हवं होतं तें आहे, खरंच आहे. इथं ती बाहुली आहे. ''

दम छाटत रामभाऊ एवढे शब्द बोलले आणि ते फलाटावरून धांवत सुटले. रामभाऊ एका फेरीवाल्याच्या दिशेनं धांवत होते. फेरीवाला एका बाहुलीला किल्ली देत होता. ती बाहुली टाळ्या वाजवीत होती, नाचत होती व तोंडानें " ऊं-ऊं '' असा स्वर काढीत होती. रामभाऊनीं ती बाहुली हस्तगत केली व ते परत आमच्या डब्याच्या दिशेनं धांवत सुटले.

" मिळाली. '' ते धापा टाकीत ओरडले, " मिळाली. ''

" जपून रामभाऊ जपून.'' झोकांड्या खात येणाऱ्या रामभाऊकडे पहात मी ओरडलों. पण रामभाऊनीं माझे शब्द ऐकलेच नाहींत. गर्दीतून वाकडे तिकडे धांवत ते डब्याच्या दारांत शिरले. ते अतिशय थकलेले दिसत होते. त्यांना धाप लागली होती. पण आनंदानें त्यांचा चेहरा फुलून आला होता. " सांपडली. '' दारांत पाऊल टाकीत ते म्हणाले, " अखेर सांपडली. '' आणि काय झालें कुणास ठाऊक पण त्यांच क्षणीं छातीवर हात दावीत रामभाऊ खालीं कोसळले. सुरू झालेली गाडी क्षणार्धात कर्कश स्वर करीत थांबली. हां-हां म्हणतां रामभाऊ तपस्वी ह्यांचे भोवतीं गर्दीचा गराडा पडला. त्या गर्दीतून कुणी सूटवाला स्टेथास्कोप काढीत पुढें झाला व रामभाऊंची नाडी तपासून तो म्हणाला, " हार्ट फेल ! सर्व कारभार संपलेला आहे. ''

माझा स्वतःच्या डोळ्यावर विश्वास बसेना—कानावर विश्वास बसेना. " हार्ट फेल ? सर्व कारभार संपला ? '' मला ते शब्द खरे वाटेनात. पण ते शब्द खरे होते. सर्व कारभार संपलेलाच होता. रामभाऊंची तपश्चर्या पूर्ण झाली होती व फळास आली होती. त्यांनीं घेतलेली बाहुली टाळ्या वाजवीत होती व नाचत होती. ती तोंडाने ऊं-ऊं असा ध्वनी करीत होती. ती बाहुली नाचत होती आणि रडत होती. त्या निर्जीव खेळण्याचाही अभिप्राय तोच होता. रामभाऊनी आपल्या आयुष्याची अखेर जिंकली होती. आम्ही रडावयाचे ते स्वतःसाठीं रडावयाचे होते. एरवीं तो प्रसंग आनंदानें टाळ्या वाजवून नाचण्याचाच होता.

हा एका मोठ्या माणसाचा जय होता. हा करुणेचा जय होता, हा कर्तव्याचा जय होता, मनुष्यापाशीं अभिमान बाळगण्याजोगें व आशा ठेवण्याजोगें जे जे कांहीं म्हणून असेल त्या साऱ्यांचा हा जय होता.

आणि त्या विजयाची माला धारण करून एक अज्ञात सैनिक तेथें शांतपणें पहुडला होता. भोवताली गर्दी वाढत होती. गोंगाट वाढत होता. अनोळखी चेहरे माना उंचावून सभोंवार डोकावत होते. त्यापैकीं कुणीहि रामभाऊ तपस्वींना ओळखत नव्हते. अनेक अपघातांपैकीं एक अपघात, अनेक मृत्यूंपैकीं एक मृत्यू एवढेंच रामभाऊंविषयीं त्यांना कळलें असावें. पण मला वाटतें मला रामभाऊंविषयीं अधिक कळलें होतें. व त्या निर्जीव बाहुलीलाहि त्यांच्याविषयीं अधिक कळलें होतें. दैदिप्यमान तपश्चर्येविषयीं— त्यांच्या त्यागी व करुणामय चरित्राविषयीं अधिक कळलें होतें. आणि म्हणून ती टाळ्या वाजवीत होती. व नाचत होती ! नाचत होती व केविलवाणा स्वर काढून रडत होती.

• • •



कुठें आहे मराठी साहित्यांतील तो " शरचंद्र '' ?



— गोपाळकृष्ण भोबे

## गोमंतकीची सांस्कृतिक पदचिन्हें : २



# नाट्य



चैत्र महिन्यापासून फाल्गुनांतल्या अमावास्येपर्यंत, पंचांगांतले तसेच स्वयंस्फूर्त असे निरनिराळे उत्सव गोमंतकांत होतात.

एकोणिसाव्या शतकांतलें पहिलें अर्धशतक पर्यंत तरी, केवळ धार्मिक आणि सांस्कृतिक परंपरा जतन करण्याच्या चढाओढीं पलीकडे, दुसरी कुठलीही ईर्षा शेंकडों देवालयें असलेल्या गोमंतकांत नव्हती. केवळ परंपरेनें आणि "वडील आचरले जो धर्म। तोचि चालविंशी कीं नेम।" म्हणून ठराविक आणि सांचेबंद असे, नवविधाभक्तीचे, दानें, हवनें, अवसर, शिविकोत्सव इत्यादि प्रकारानी; व पंचपक्वान्नांच्या समाराधनानीं–"उदरभरण नोहे जाणिजे यज्ञकर्म" अशा जयघोषांत–युक्त असे त्यावेळचे उत्सव असत.

पुढल्या पंचवीस वर्षांत अधिक करमणुकीची जोड म्हणून हरिकीर्तनाबरोबरच भजनी-भारूड वजा–ज्याला 'लळीत' असें सुबक आणि संगीत नांव दिलें, तो करमणुकीचा नवा प्रकार रूढ झाला.

समाराधनेनंतर उत्सव संपला, म्हणून ढेकर देत घरोघरीं परतणाऱ्यांना कधीं कधीं पहाटेपर्यंत जागायला एक नवें साधन मिळालें होतें. हरिकीर्तनांत वृत्ति रंगे, तशीच किंबहुना अधीकच ती लळितांत रंगायला लागली होती. कालांतरानें भारुडांत आख्यानांचा समावेश झाला. पहिल्यापेक्षां याला अधीक लोकप्रियता लाभूं लागली. कोंकणांतून आलेल्या दशावतारी खेळानांही लळितांत आश्रय मिळूं लागला. हळूहळू लळितांत नाट्य शिरूं लागलें होतें.

हें सारें होत होतें, लोकांचें क्षणाचें रंजन करीत होतें; पण त्याला बांधेसुदपणा नव्हता, सुसुत्रता नव्हती. विस्कळीतपणा आणि कदाचित् अर्थशून्यताही असल्यानें त्याच्या खुणा शिल्लक राहात नव्हत्या. ज्ञानेश्वर, मुक्तेश्वर, एकनाथाच्या वाङ्मयांतलें अमृत रोज प्राशन करणाऱ्या आणि अंतरीचा ज्ञानदिवा तेवत ठेवणाऱ्यांना तें मोहवूं शकत नव्हतें; परंतु त्यांना फार वेळ वाट बघावी लागली नाहीं.

तीं भजनीं भारुडें, आख्यानें, ते दशावतारी खेळ इत्यादि साऱ्या प्रकारांची स्फूर्ति घेऊन प्रमाणबद्ध आणि नाट्यपूर्ण अशा नव्या लळितकाराचा जन्म याचवेळीं झाला होता त्यांचें नांव "कृष्णभट बांदकर."

सद्गुरुच्या कृपाप्रसादानें आणि अनुग्रहानें आपल्या 'डोंगरी' गांवी त्यांनी श्रीरामाचें देवालय स्थापलें, आणि श्रीरामनवमीच्या उत्सवाप्रित्यर्थ होणाऱ्या करमणुकीच्या कार्यक्रमासाठीं त्यानीं नाट्यपूर्ण लळितें रचलीं.

शुका-रंभा, कैकयी मंथरा आदि पौराणिक कथानकांच्या आधारावर थोड्याश्या संवादाबरोबरच प्रासादिक पदें साक्या-दिंड्या आदि-वृत्तांची ही योजना या लळितांत होती. ओज, प्रासाद, पदलालित्य इत्यादि गुणानीं युक्त अशा या कविता, सुबोध आणि अर्थपूर्ण असल्यानें, त्या काळीं घरोघरीं त्या गुणगुणल्या जाऊं लागल्या, लोकप्रियही झाल्या !

गोमंतकाच्या नाट्य-परंपरेचा हा उगम असें मानायला हरकत नाहीं. असें सांगतात कीं, अण्णासाहेब किर्लोस्करानाहीं कृष्णभट बांदकरांचीं हीं लळितें पाहून स्फूर्ति झाली. मिठाच्या खरेदीसाठीं क्राफर्डसाहेबांबरोबर अण्णासाहेब गोव्यांत गेले होते. तिथल्या मुक्कामांत त्यांनी हीं लळितें पाहिलीं होतीं; इतकेंच नव्हे तर त्यांनी बांदकरांना "तुम्हीं आपल्या संचासह महाराष्ट्रांत चला. तिथें तुम्हांला पैसाही खूप मिळेल," असें सांगितलें होतें; परंतू ईश्वरी सेवेसाठीं रचलेल्या ह्या लळितांचा आपण व्यापार करणार नसल्याचें बांदकरानीं सांगितल्या वरून, निदान हस्तलिखितें तरी मिळावीं असा अण्णासाहेबांचा आग्रह होता; पण केवळ मुखोद्गत असलेल्या ह्या लळितांचीं हस्तलिखितेंही नाहींत असें कळल्यावर, स्वतः रचण्याबद्दल आशीर्वाद मागितला. तो श्रीरामाचा प्रसाद अंगाऱ्यासह मिळाला ! असें बांदकरांचे चरित्रकार लिहितात. असो !

इथून स्फूर्ति घेऊन गेलेल्या अण्णासाहेबानीं आपल्या 'सौभद्र' 'शाकुंतल' 'रामराज्य वियोग' या नाटकांसह 'किर्लोस्कर संगीत मंडळी' गोव्यांत नेली तो काल एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीचा होती. अण्णासाहेबांच्या या नाटकानीं गोमंतकाला एक नवी दृष्टि दिली, आणि उत्सवांतील लळितांबरोबरच अशीं साग्रसंगीत नाटकें करण्याची प्रथा गांवोगांवीं निर्माण होवूं लागली.

अर्थातच संत वाङ्मयाच्या गाढा व्यासंग असलेल्यानां ही क्रांति स्वस्थ बसूं देईना. त्यांना स्फुर्ति झाली आणि खुद्द गोमंतकांत किर्लोस्कर सांप्रदायी असे नाटकार उदयाला आले. म्हापसें येथें सलप धावजेकर, कर्पे नाटेकर यानीं संयुक्त प्रयत्नानें नाटकें लिहिली. त्यासाठीं संच स्थापन केले. या संचाकडून त्यांचीं नाटकें गांवोगांवीं व्हायला लागलीं.

लोकप्रिय असा पौराणिक प्रसंग निवडावा, थोड्याशा संवादानीं युक्त असें संगीतिकावजा नाटक लिहावें आणि गांवातल्याच संचाकडून उत्सवाप्रीत्यर्थ तें प्रयोग रूपानें करून घ्यावें, असेही प्रकार खूप व्हायला लागले. कारण चार पांचशें वस्तीच्या आमच्या लहानशा नेरूल गांवांत पूर्वी सहा नाटकें होत असत. शिमगोत्सवाला भंडारी व गावित समाज तीन नाटकें गांवांतल्या पिंपळाजवळ मांडव घालून करीत असत, आणि सारस्वतांची तीन नाटकें.



अनुक्रमणिका

आतां तंत्र समजलें होतें, नाटकाची छापिल पुस्तकें हाताशीं आलीं होतीं, वेशभूषा नेपथ्य आदि गोष्टी कळूं लागल्या होत्या—नाट्य आतां हाडीं मांसीं खिळूं लागलें होतें.

जसजशा नव्या गोष्टी कळूं लागल्या तसतसे नवनवे लेखक उदयाला येऊं लागले. माधवराव हेरे, मणेरीकर, सांवर्डेकर वगैरेंनीं आपल्या नाटकांत थोडासा नव्या तंत्राचा अवलंब केला आणि गोमंतकाच्या नाट्य परंपरेची प्रगति होवूं लागली.

लेखक निर्माण झाले एवढ्यावरच थांबले नाहीं, तर किर्लोस्करांसारख्या नाटक मंडळ्याही स्थापन झाल्या. 'गोवा संगीत मंडळी' ही नाट्य संस्था त्याच सुमारास निघाली, ज्या कंपनीतून महाराष्ट्राला सुपरिचित असलेल्या दत्तोपंत हल्याळकर ह्या पल्लेदार आवाजाच्या नटाच्या गुणांचा विकास झाला.

याच कालांत स्त्रियांच्या भूमिकाहि स्त्रियांनीं केल्या. शिवाय तोडीस तोड म्हणून फक्त स्त्रियांचीच अशीही एक नाटक कंपनी निघाली, ज्यांत पुरुष भूमिकाही स्त्रियाच करीत.

लळितांची आणि काल्यांची जागा नाटकांनीं घेतली व नाटकें करायची म्हटलीं, कीं तीं देवालयांतील उत्सवाप्रित्यर्थ होणाऱ्या खर्चांत भागेनात. पेटीवाला, तबलजी, गॅसबत्ती, मांडव, वेषभूषा, नेपथ्य आणि इतर खर्च आवाक्याबाहेर जायला लागला. मग वर्गण्या निघाल्या, त्यांच्यातही भागेना, तेव्हां पारंपारिक रूढ अशा कांहीं भोळ्या म्हणून, कांहीं तत्कालिन सुशिक्षितांनीं अमान्य म्हणून, तसेंच फालतू खर्च नको म्हणूनही बाद होऊं लागल्या. कांहीं कांहीं ठिकाणीं तर आज मूळ उत्सवाच्या कांहीं खुणा तेवढ्या बाकी म्हणून राहिलेल्या आहेत आणि नाटकें म्हणजेच उत्सव असा स्वाभाविक अर्थ होऊन बसला आहे.

आज गोमंतकांत वर्षांतल्या सर्व उत्सवांप्रित्यर्थ साडेसहासें सातसें नाट्य प्रयोग होतात.

सारस्वत, दैवज्ञ, भंडारी आणि गावित हे चातुर्वर्ण्य ही परंपरा चालवित आहेत. प्रत्येक गांवांत सारस्वतांची निराळीं, दैवज्ञांचीं निराळीं, भंडारी व गावितांचीही निरनिराळीं अशीं नाटकें होतात.

श्री रामनवमीला देवळांत लळितं होत असत, त्यांत दैवज्ञांचाही भाग होता. मागाहून दैवज्ञानीं स्वतंत्र असें एक नाटक गांवांतल्या पिंपळाजवळ केलें आणि नवी प्रथा पाडली.

उत्सव म्हटला, कीं मतभेद आले, भांडणें आलीं, नवे पक्षोपक्ष निर्माण झाले, आणि कुणी सत्यनारायणाच्या निमित्तानें किंवा देवचाराच्या आंगवणीच्या उत्सवाच्या निमित्तानें, नव्यां नव्या नाट्य प्रयोगांचा पायंडा पाडला आणि प्रथा घालून दिली. आज आमच्या गावांत बावीस नाटकें होतात. नाट्य-प्रियतेची ही रग एवढी आहे कीं ऐन वेळेला वाटेल तीं साहसाचीं कामें करायलाही त्यांची तयारी असते. एका रात्रींत हजार लोकांना बसतां येईल असा मांडव घालण्यापासून तों सीन मध्यें त्या वेळीं लागणाऱ्या जिवंत सापाला धरून आणण्यापर्यंत सर्व कामें उत्साही अंतःकरणानें हे लोक करतील.

मानापमानातल्या धैर्यधराला शोभेसी तलवार पोषाखाच्या पेटी बरोबर आली नव्हती. धैर्यधर जगन्नाथ नाईक थोडासा नाराज झाला; पण साडेसहा फुट उंचीचा धिप्पाड सुका नाईक तें समजला. त्यावेळीं अशा मोटारी नव्हत्या. सायकल गांवात एखादी दुसरी, रात्रीचे नऊ वाजलेले, आणि घुमटावरची चंद्रावळ संपून बाराला नाटक सुरु व्हायचें, तलवार आणायची म्हणजे तीं पणजीहून आणली पाहिजे होती. ती गोष्ट तेवढ्यावरच राहिली. परंतु चंद्रावळ संपली, ठो ऽ दिशीं बार झाला, "पंचशरें गग्नवरें संपलें..." आणि धैर्यधराचा पहिला प्रवेश झाला तो सोन्याच्या मुठीची तलवार लावून. ती तलवार सुभा नायकानें आणली होती.

तीरासारखा धांवत गेला. मांडवी नदी भरतीच्या पाण्यानें झोत घेऊन वहात होती. वहातुकीचीं साधनें नऊ वांजतांच बंद झाली होतीं; परंतु उत्सवमूर्ति सुका नाईक डगमगला नाहीं. तेवढ्या रात्रीं त्या मिट्ट काळोखांत कपडे काढून त्याची गटडी बांधून, दातांत धरून, पोहून तो पणजीला गेला, ओळखीच्या माणसाचा वशीला लावून त्यानें एका सार्जंट ऑफिसर कडून तलवार मिळवली आणि साडेबाराच्या आंत तो परत आला. एवढा दांडगा उत्साह !

हें एक नाट्योत्साहाचें शिगेचें उदाहरण म्हणून सांगितलें.

सुराच्या सच्चेपणाबरोबर लयीच्या पक्केपणाचें वरदान गोमंतकाला लाभलें असल्यानें संगीत नाटकेंच तिथें ज्यास्त प्रिय आहेत. महाराष्ट्रांतल्या चांगल्या संगीत नाटक मंडळ्यांचें स्वागत मुक्त हस्तानें गोमंतकांत होतें तें याच कारणानें.

नाट्य-प्रियतेबरो व श्रद्धेबद्दलही इथें थोडेसें सांगावेसें वाटतें. तालीम मास्तर म्हटला, कीं तो परम गुरू; मार्गशीर्षात तालीम मास्तर गावात यायचा आणि गांवचे उत्सव पूर्ण करून ज्येष्ठ अखेरीला तो जायचा. गांव सुपीक असल्यानें आंबे फणसांपासून कांदे मिर्च्यांपर्यंत गाडी भरून भेटी घेऊन धमनींतून तो गांव सोडी, त्यावेळीं साश्रुनयनानीं गांवच्या सीमेपर्यंत पोंचवायला गेलेली मंडळी कांहींतरी हरवल्यासारखी परत येई.

प्रत्येकाला अथपासून इतिपर्यंत नाटक पाठ असायचे.

सौभद्रांतल्या 'नमुनी ईशचरणा' पासून 'रणधीरा श्रींवरवरद' पर्यंत सगळीं पदें संवादासकट तोंडपाठ म्हणून दाखवणारे शंभरीला आलेले कांहीं लोक अजून आहेत.

पौराणिक आणि ऐतिहासिक नाटकें गोमंतकाला ज्यास्त प्रिय आहेत. त्या खालोखाल सामाजिक. सरकारी बंधनांत हल्लीं ऐतिहासिक नाट्य प्रयोग होऊं शकत नाहींत, नवीं पुस्तकेंही जात नाहींत, तरीपण अत्यंत कष्टसाध्य रीतिनें पैदा करून, उत्सवप्रिय गोमंतकियांनीं आणली नाट्यप्रियता नंदादीपासारखी तेवत ठेवली आहे. भारतांतल्या इतर कुठल्याही मराठी भाषिक प्रांतापेक्षां गोमंतकांत नाट्य-वाङ्मयाचा खप दसपट अधीक होता, हें कुठलाही प्रकाशक कबूल करील !

नाट्य लेखनांतली गोमंतकियांची परंपरा मंदगतीची असली तरी ती चालू आहे. सखारामपंत बर्वे यांनी 'जळता गोमंतक', 'नवी दृष्टि', 'नंद किशोर' आदि नाटकें लिहून मोलाची भर घातलेली आहे. व्यंकटेश विष्णु वैद्यानी 'स्वातंत्र्यवीर', 'गोमंतक विजय' वगैरे नाटके लिहिलेलीं आहेत. मोतिराम गजानन रांगणेकर आणि हरी विठ्ठल देसाई यांनी मात्र आपल्याबरोबर गोमंतकाचेंही नांव उजळ केलेले आहे. त्यांच्या नाट्य-लेखनाविषयीं अधीक काय सांगावें.

आजही कांहीं ताज्या दमाच्या रक्तांत नाट्य लेखनाचा विकास दिसून येत आहे. कोंकणी भाषेंतही नाट्यप्रयोग मोठ्या प्रमाणांत होऊं लागलेले आहेत, त्याला रसिकांची दादही तशीच मिळूं लागलेली आहे. गोमंतकाच्या नाट्य-परंपरेच्या होऊं लागलेल्या उदयाला हीं शुभ चिन्हेंच होत आहेत असे मानायला हरकत नाहीं !

• • •

*क्षणभर त्यांना रुखरुख वाटली कीं बाबुरावांनीं जातांना आपणाला सांगायला हवें होतें. दुसऱ्याच क्षणीं मनाला सावरीत त्या पुटपुटल्या 'काय म्हणून ? मला त्यांनीं सांगावें असें मीं त्याच्यासाठीं कांहीं केलें थोडेंच ? '*



# सभ्य गृहस्थ

शिरीष पै

'वेस्ट व्ह्यू' हॉटेलची रचना मोठी आकर्षक होती. सर्वसामान्य हॉटेलांत एकाला एक अशा रांगेनें खोल्या लागलेल्या असतात तशी पद्धत येथें नव्हती. इथें प्रत्येक खोली म्हणजे एक स्वतंत्र बैठी छोटेखानी बंगलीच होती. आधींच 'वेस्ट व्ह्यू' हॉटेलचे आवार प्रशस्त होतें. हॉटेलच्या प्रवेशद्वारांतून पुढच्या ऑफिसच्या इमारतीकडे जाणाऱ्या रुंद तांबड्या मातीच्या रस्त्यावर कडेला लालपिवळ्या कर्दळी दाटीनें दाटीनें लावल्या होत्या. ऑफीसच्या मागील बाजूस भोजनगृह आणि स्वयंपाकघर होते. त्याच्याहि मागें योग्य ते अंतर एकमेकांत ठेवून वीस पंचवीस छोट्या छोट्या बंगल्या बांधलेल्या होत्या. हॉटेलच्या आवारांत झिप्र्या सुरुंची ताडमाड वाढलेली असंख्य झाडे होती आणि सर्वत्र गार हिरवळ पसरली होती. हॉटेलचें आवार नेहमी शांत असे. अधून मधून एखादा रानपक्षी लांबलचक सूर ओढी. ह्यापलीकडे कसलाहि आवाज तेथें ऐकूं येत नसे. थंड हवेसाठीं आणि विश्रांति-साठीं 'वेस्ट व्ह्यू' हें एक आदर्श हॉटेल होतें यांत शंका नव्हती.

म्हणूनच अहिल्याबाई देशमुख या वर्षी सुटीला 'वेस्ट व्ह्यू' हॉटेलांतच येऊन राहिल्या होत्या. दर वर्षी शाळेला सुटी लागली म्हणजे शाळेंतली उरलेली शेवटची कामें आटोपून त्या सावकाश आपल्या भावाकडे रहावयास जात. एरवी बाहेरगावीं त्या क्वचितच जात. शाळेची सहल निघाली तरच काय तें त्यांचें परगांवी जाणे होई. एरवी त्या शाळेंचें कामच करीत रहात. ताराबाई हाय-स्कूलाच्या त्या मुख्याध्यापिका झाल्या तेव्हांपासून त्यांनीं सर्वस्वी शाळेच्या कामालाच स्वतःला वाहून घेतलें होतें. त्या आधीं शाळेंत शिक्षिका असतांनासुद्धां त्यांना शाळेंतील कामापलीकडे इतर कुठ-ल्याहिं गोष्टीचें क्वचितच आकर्षण वाटलें होतें.

परंतु गेल्या वर्षीपासून मात्र त्यांना कुठेंतरी रमणीय स्थळीं एकटेंच जाऊन मन रमवावें असें फार वाटूं लागलें होतें. त्यांच्या शाळेंतल्या तीनचार अविवाहित शिक्षिका गेल्या वर्षी आपला एक लहानसा गट बनवून अशाच सुट्टींत मजेची सहल करून आल्या होत्या. तेथून परत आल्यानंतर त्यांच्या तोंडून सहलीच्या गमती ऐकतांना अहिल्याबाईंना आंत कुठेतरी खचदिशी बोचणी लागल्यासारखें वाटूं लागले होतें. वास्तविक त्या शिक्षिकांनीं जातेवेळीं अहिल्याबाईंना आपल्याबरोबर येण्यासाठीं पुष्कळ आग्रह केला होता. पण हाताखालीं काम करणाऱ्या शिक्षिकांमध्यें मिसळावयाचें, त्यांच्यासह खिदळत फिरावयाचें ही नुसती कल्पनाच अहिल्याबाईंना शिस्तीला कमीपणा आणणारी वाटली होती. अहिल्याबाईंची कडक शिस्त हा तर त्यांच्या यशाचा मूळ पाया होता. त्यांची गंभीर गोरी उग्र मुद्रा पाहताच शाळेंतल्या सर्वांत वात्रट मुलींहि जागच्या-जागीं थरथरूं लागत. त्यांच्या पायांतले काळे बूट व्हरांड्यांत वाजूं लागले म्हणजे वर्गांतले आवाज बंद होत आणि साऱ्या शाळेंत स्मशानांतली शांतता पसरे. ताराबाई हायस्कूलच्या मुख्याध्यापिका झाल्यापासून त्यांनीं शाळेची घडी अशी कडक बसवली होती कीं तिला बारीकहि सुरकुती पडणें अशक्य होतें. म्हणूनच गेल्यावर्षी शिक्षिकांसह सहलीला जाण्यास अहिल्याबाईंनीं नकार दिला होता.

अनुक्रमणिका

म्हणूनच ' वेस्ट व्ह्यू ' हॉटेलांत येतांना त्या कुणालाहि न सांगता अगदी एकट्या आल्या होत्या. आपल्या बारीक सारिक हालचालीहि अत्यंत गुप्त असाव्यात असें अहिल्याबाईंचें स्पष्ट मत होतें. तरीपण ऐन वेळीं त्यांच्या डोक्यांत एक विचित्र कल्पना डोकावलीच. कांहीं झालें तरी आपण बाईमाणूस ! बरोबर अगदीच कोणी नसणें म्हणजे लोकांच्या मनांत संशय निर्माण करणें. अगदी नाइलाज म्हणून त्यांनी आपल्या कामाच्या बाईला बरोबर घेतले.

' वेस्ट व्ह्यू ' हॉटेलांत त्यांना मिळालेली बंगलीहि अगदी मनाजोगती होती. आवारांत एका बाजूला इतर बंगल्यांपासून कांहींशी दूर अशी ती बंगली होती. बंगलीच्या मागे किर्र रान माजलेले होते. बंगलीच्या व्हरांड्यांत बसल्यावर मात्र समोरचा देखावा मोठा सुंदर दिसे. आवारापलीकडे पसरलेले पठार पश्चिमेकडे अचानक तुटले होते. त्यानंतर होती खोल खोल दरी. दरीपलीकडे होते धूसर निळे डोंगर. रोज संध्याकळीं सूर्य मावळे तो नेमका दोन डोंगरांच्या मधोमध. त्यावेळी तांबूस सोनेरी ऊन दरींतून क्रमाक्रमानें सरकत जाई आणि सूर्य मावळला कीं धुक्यानें माखलेल्या काळोखानें सारी दरी तुडुंब भरून जाई.

तें दृश्य बंगलीच्या व्हरांड्यांतून अगदीं स्पष्ट दिसें. डोळ्यावरचा चष्मा काढून अहिल्याबाई आरामखुर्चीवर पडल्या पडल्या तो गूढ सूर्यास्त पहात. तो पहात असतांना त्यांच्या चोहोंबाजूनें आवळून बंदोबस्तांत ठेवलेल्या थंड अंतःकरणांतहि एक उष्ण उर्मि सळसळू लागे आणि मग उगीचच त्यांना अपराध्यासारखें वाटूं लागे. तें गंहिवरणेंहि त्यांना नकोसें होऊन जाई आणि सूर्यास्ताच्या देखाव्याकडे पाठ फिरवून त्या आंतल्या खोलींत जात व डोळ्याला चष्मा लावून शिक्षण शास्त्रावर प्रसिद्ध झालेल्या एखाद्या नव्या पुस्तकामध्यें गर्क होत. तें वाचतांना हातांत लठ्ठ तांबडी पेन्सिल घेऊन त्यांत महत्त्वाच्या जागीं खुणा करण्यास त्या चुकत नसत.

असे दोनतीन दिवस तर ठरविलेल्या वेळापत्रकांप्रमाणें योग्य त्या शिस्तींत गेले. चवथ्या दिवशीं सकाळीं त्या ' नाश्ता ' घेण्यासाठीं भोजनगृहामध्यें गेल्या. नाश्त्याची वेळ होते ना होते तोंच त्या



भोजनगृहामध्यें जात. हॉटेलमधले इतर पाहुणे सावकाश येत रहात. त्यामुळें सहसा कोणी येण्यापूर्वीच त्या आपला नाश्ता आटोपून बंगलींत परत जात. हीच तऱ्हा जेवतांनाहि कायम असे. त्यामुळें हॉटेलमध्यें उतरलेल्या पाव्हण्यांशीं आत्तापर्यंत अहिल्याबाईंचा विशेष संपर्क आला नव्हता. आज त्या भोजनगृहांत गेल्या तेव्हां मात्र त्यांच्या आधीहि येण्याची दक्षता कांहीं व्यक्तींनी घेतलेली दिसली. अहिल्याबाई खालच्या मानेनें आपल्या कोपऱ्यांतल्या टेबलाकडे जाऊन बसल्या. खुर्चीवर बसल्यानंतर त्यांनीं क्षणभरच हॉलमध्यें नजर फिरविली. त्यांच्या डाव्या हाताच्या टेबलावर कुणीतरी टक्कल पडलेला स्थूल बुटका गृहस्थ टाईम्स वाचीत बसला होता. त्यानें अंगांत तपकिरी रंगाचा गरम कोट घातला होता आणि गळ्याभोवती एक पांढरा मफलर गुंडाळला होता. भोजनगृहांतल्या खिडकीपाशीं दुसरा एक उंच, मध्यम अंगाचा गृहस्थ पाठमोरा उभा होता. आपले दोनहि हात त्यानें पॅंटच्या खिशांत मजेनें अडकवले होते आणि तो खिडकीबाहेरील दृश्य पहात शीळ घालीत उभा राहिला होता.

फार वेळ तिऱ्हाईत पुरुषांकडे पहाणें योग्य नव्हे असें जाणून अहिल्याबाईंनी कपाळावर आठ्या आणल्या आणि त्या पुढ्यांतील टेबलावरील पांढऱ्याशुभ्र कापडावर नजर रोखून स्तब्ध बसल्या. तेवढ्यांत नाश्त्याचे पदार्थ घेऊन वेटर आलाच. अहिल्याबाईंपुढें बशा ठेवून परत जाताना खिडकीजवळ उभ्या असलेल्या गृहस्थास म्हणाला, ' साब, आपका नाश्ता रखना है क्या ? ' त्याबरोबर तो गृहस्थ सट्कन सफाईनें वळून म्हणाला, ' अच्छा, रख दो भाई ' नंतर तो चालत सरळ अहिल्याबाईंच्या टेबलाकडेच आला आणि मान लववून त्यांना म्हणाला, ' गुडमॉर्निंग मॅडम ! ' अहिल्याबाईंनीं प्रत्युत्तरादाखल कांहींहि न म्हणतां नुसतीच झटक्यांत मान हलविली. ओळखदेख नसतांना ह्या गृहस्थानें अशी सलगी दाखवावी हें त्यांना मुळीच आवडलें नाहीं. पलीकडच्या टेबलावर बसलेल्या टक्कल पडलेल्या गृहस्थालाही हें मुळींच आवडले नव्हते असें दिसलें. कारण तो भुवया उंचावून तिरसटपणें ह्या उंच गृहस्थाकडे रोखून पहात राहिला. उंच गृहस्थ तेवढ्यावरच थांबला नाहीं. तो सरळ टक्कल पडलेल्या गृहस्थाच्या टेबलाकडेच गेला आणि खुर्ची ओढून घेऊन बसत म्हणाला, ' माफ करा हं. पण एवढ्या मोठ्या ह्या हॉटेलांत आपण तीनच मराठी माणसं आहोत. बाकी सिंधी गुजराथ्यांचाच भरणा आहे. त्यामुळें ओळख नसूनहि मी तुमच्या टेबलापाशी येऊन बसलोय्. हॉटेलाच्या ऑफीसमध्यें नांवाच्या पाट्या लावल्या आहेत ना त्यांत तुमचं नी ह्या अहिल्याबाईंचं नांव मी आज सकाळी आल्या बरोबरच पाहिलं. वेटर म्हणाला—तुम्ही दोघे सर्वांच्या आधीं नाश्ता घ्यायला येता, म्हणून मुद्दाम थांबून राहिलों. कसं ओळखलं मी तुम्हा दोघांना बरोब्बर ! मराठी माणसाचे चेहरे लपायचे नाहींत कुठे ! मग काय बाळासाहेब नाईक, सिगरेट घेता का ? नाश्ता झालेला दिसतोय् तुमचा. माझं नांव बाबुराव ढवळे बरं का ! ' बाबुराव एक क्षणभरहि न थांबतां बोलतच राहिले.

मुद्रेवर आत्यंतिक तिरस्काराचा आविर्भाव आणून आणि उप-

हासानें ओठ वाकडे करून अहिल्याबाई बाबुरावांकडे अधूनमधून दृष्टिक्षेप टाकीत होत्या. त्यांना सहानुभूति दाखविण्यासाठीं बाळा-साहेबहि 'काय माणूस आहे हा' अशा तऱ्हेचे भाव चेहऱ्यावर आणून त्यांच्या दृष्टिक्षेपाला साथ देत होते. बाबुरावांच्या पुढ्यांत नाश्त्याचे पदार्थ येऊन पडतांच त्यांनीं तोंडाचा मचमच असा आवाज करीत खावयास सुरुवात केली. खातां खातां मध्येंच त्यांच्या हातांतला पाव खाली सतरंजीवर पडला. चहा पितांनाहि ते मोठमोठे भुरके मारून तो पीत होते नी मध्येंच त्यांच्या कपांतला चहा कपाला हिसका बसून टेबलावर सांडला देखील. खातांना त्यांची बडबड चालू होतीच. बाळासाहेब नुसते 'हुं' 'हुं' करीत होते.

'किती अव्यवस्थित आणि गबाळा माणूस आहे हा!' अहिल्याबाई तोंडांतल्या तोंडांत पुटपुटल्या. नाश्ता आटोपतांच त्या उठून भोजनगृहाबाहेर चालू लागल्या. कुठल्याकुठें ही ब्याद ह्या हॉटेलांत येऊन उपटली, असें त्यांना झालें. त्या मानानें ते बाळासाहेब किती सभ्य आणि अदबशीर होते! बाबुरावांची बेताल बडबड त्यांनीं मुकाट्यानें एकून घेतलीच कशी ह्याचें अहिल्याबाईंना आश्चर्य वाटलें.

इतक्या दिवसांत बाळासाहेब हॉटेलांत होते की नव्हते हेहि समजले नाहीं. आणि हा गृहस्थ आला तोच कुत्र्यासारखा भुंकत. खातांना काट्याचमच्यांचा आवाज तरी किती करीत होता! बाळासाहेबांच्या हातांत काटासुरी आहे की नाहीं हे देखील समजले नसते. बोलतांना तरी बाबुराव किती उंच सूर काढून बोलत होते. बाळासाहेबांच्या तोंडांतून शब्द निघाला की नाहीं हेंहि ओळखला आले नसते. कसा शिस्तींत वागत होता तो माणूस! नाहींतर हा—अगदीच मेला असभ्य वाटला!

बंगलींत येताच अहिल्याबाई स्नानाच्या तयारीला लागल्या. स्नान आटोपून त्या व्हरांड्यामध्ये येऊन बसल्या. स्नान केल्यानंतर थोडा वेळ तरी पवित्र विचार मनामध्यें आणून चिंतन करीत बसावें अशी त्यांची पद्धत असल्यानें त्या गीतेमधला एक अध्याय वाचू लागल्या. त्यांची नजर यांत्रिकपणें पुढील अक्षरावरून फिरत होती. का कुणास ठाऊक, त्यांना एकदम बाबुरावांची आठवण आली. प्रौढ वयांत पोरकटाप्रमाणें त्यांनीं राखलेल्या कोरीव मिशा त्यांना मुळींच आवडल्या नव्हत्या. त्याचप्रमाणें त्यांनीं अंगांत घातलेला लालकाळे पट्टे असलेला पिवळा बुशकोट पाहून त्यांच्या मस्तकांत तिडीक उठली होती. खिशांत सिगरेटचीं दोन पाकिटे होतीच. कमालीचा व्यसनी असला पाहिजे हा माणूस! अशा असभ्य माणसाचा विचार गीता वाचतांना मनांत येऊं दिल्याबद्दल अहिल्याबाईंना स्वतःचा अतिशय राग आला. त्यापेक्षा ते बाळासाहेब किती सज्जन होते! डोके हलवून अहिल्या-बाईंनी बाबुरावांचा विचार झटकून टाकला आणि त्या पुढातल्या संस्कृत श्लोकांवरील मराठी टीका वाचूं लागल्या.

दुपारच्या शांत वेळीं शेजारच्या बंगलींतून ग्रामोफोनवरील रेकॉ-

ईचे सूर ऐकू येऊं लागले. अहिल्याबाईंचा जरा कुठें डोळा लागत होता तोंच त्या स्वरांनी त्यांची झोंप पार उडवून लावली. कान टवकारून त्या ऐकूं लागल्या. गाण्यांचे शब्द त्यांना साधारण उमगले तेव्हां त्या रागानें स्वतःशींच पुटपुटल्या, 'फाजील मेला. कुठली चावट गाणीं लावून ऐकत बसला आहे.' बराच वेळ झाला तरी संगीताची मैफल संपेना.

अहिल्याबाई चडफडत निमूटपणे बिछान्यावर पडून राहिल्या. मनांतल्या मनांत बाबुरावांना शिव्या देण्याखेरीज दुसरा कुठलाहि मार्ग शिल्लक उरला नव्हता. शेवटीं संध्याकाळीं लांब कुठेतरी फिरायला जावें म्हणजे ह्या माणसाची शेजारची कटकट चुकेल असा निश्चय करून त्या घट्ट डोळे मिटून पडून राहिल्या. सायंकाळीं उन्हें सौम्य झाली तेव्हां अंगावर गरम शाल घेऊन त्या बाहेर पडल्या. रानामधला एक शांत रस्ता पकडून त्या हळुहळु चालत राहिल्या. उन्हें उतरल्यामुळें रानांतला अंतर्भाग आतां अंधारला होता नी सुन्न गारवा सार्‍या रानांत पसरून राहिला होता. उजव्या बाजूला रान आणि डाव्या बजूला तुटत गेलेले पठार असा तो तांबडमातीचा रस्ता तुडवीत अहिल्याबाई एकट्याच चालल्या होत्या. डोंगराला वळसा घालून तो रस्ता थेट वरच्या टोकाला जाऊन भिडला होता नी त्या टोकाखालचा कडा तुटत तुटत खोल दरींत जाऊन बुडला होता. अहिल्याबाई एकट्याच चालल्या होत्या खर्‍या पण जसजशा त्या पुढे जात होत्या तसतशी त्यांच्या छातीमध्यें अचानक धडधड उठू लागली होती. एवढा मोठा विराट निसर्ग भोवती पसरला असूनहि त्यांना सारे शून्य वाटत होतें. प्रत्येक क्षणीं उलटें फिरावें आणि हॉटेलकडे पळत सुटावें असें त्यांना वाटूं लागले होते. ह्या भयाण एकांतापेक्षां त्या असभ्य गृहस्थाची कटकट परवडली असाहि विचार त्यांच्या मनांत डोकावला. तरीपण हिय्या करून त्या तशाच पुढें चालल्या होत्या. चालतां चालतां रस्त्याचे कड्यावरलें टोक त्यांनीं गाठलें. पण खाली डोकावून पहाण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत उरलें नव्हतें. कड्याचे टोक थोडेसें खाली उतरत जाऊन एका चिमुकल्या पठारावर अडखळले होते व त्या पठाराखाली अक्राळ-विक्राळ दरी होती. अहिल्याबाईनीं एका हातानें धडधडतें अंतःकरण दाबून धरीत हळूच वाकून पाहिले. आणि त्या चांगल्याच दचकल्या. खालच्या पठारावर एका दुमडल्या हाताची उशी करून बाबुराव लोळत पडले होते. त्यांच्या दुसर्‍या हातांत अर्धवट जळलेली सिगारेट होती. अहिल्याबाईनीं खाली डोकावून पहायला आणि त्यांनीं वर नजर लावावयाला एकच गाठ पडली. खालीं डोकावणार्‍या अहिल्याबाईंना पाहून ते एकदम उठून उभे राहिले नी मोठ्यानें ओरडून म्हणाले, 'काय, खाली यायचा विचार आहे काय तुमचा ?'

अहिल्याबाईनीं घाबरून 'नाहीं, नाहीं' म्हटलें नी त्या मागें सरकल्या. कड्याच्या भिंतीवरील रुंद फत्तरांवर पाय रोवीत बाबुराव भराभर वर चढून आले, आणि हसून म्हणाले, 'किती सुंदर जागा आहे नाहीं ? आणि हें छोटेसें पठार म्हणजे ह्या कड्यावरचें सिंहासनच आहे नाहीं का ?'

अहिल्याबाई नुसत्या मान डोलवीत राहिल्या. खरें म्हणजे त्या मनांतून घाबरल्या होत्या. कारण आतां सूर्य मावळून गेला होता. खालचे रान तर काळेंमिट्ट दिसत होतें. अशा निर्जन ठिकाणीं नी अशा भलत्या वेळीं आपण बाबुरावांसह एकटें इथें असणें फार घातुक आहे हीच कल्पना त्यांना भेडसावीत होती. शिवाय कड्यावरून खाली पठारावर उतरून जाणारा हा रानवट माणूस त्यांना मुळीच भरवंशाचा वाटत नव्हता.

'मला वाटतं आपण जाऊं या, इथं फार वेळ रहाणं बरं नव्हे,' त्या गंभीर कडवट मुद्रा करून म्हणाल्या. 'का, भ्यालात कीं काय ?' बाबुराव मोठ्यानें हसत म्हणालें, 'अहो मी तर मध्यरात्री सुद्धा येथें येऊन बसेन. भ्यायचं कुणाला नी कशासाठीं ?' 'तसं नव्हे ! पण आपलं दिवे लागणीला परत गेलेलं बरं !' अहिल्याबाई वर्गातल्या विद्यार्थिनीला समजावून सांगावें तशा आविर्भावानें म्हणाल्या. 'बरं, चला तर', बाबूराव लहान मुलासारखें तोंडाचा चंबू करून म्हणाले. 'तुम्हीं पुढे व्हा, मी मागून येते,' अहिल्याबाई निर्विकार स्वरांत म्हणाल्या. 'अन् वाघानं तुम्हाला मागल्या मागे पळवून नेलं तर मी काय करूं हो ?' बाबुराव त्यांना भिववीत बोलले. अहिल्याबाई कांही एक न बोलता निमूटपणें त्यांच्याबरोबर चालू लागल्या. दुपारच्या संगीतमैफलीबद्दल बाबुरावांना सुनवावें असें त्यांना सारखें वाटत होतें. पण यावेळीं बाबुरावांच्या सोबतीची त्यांना गरज असल्यामुळें ती गोष्ट काढण्याचें त्यांना धैर्य झालें नाहीं. मध्येंच रस्ता दाट रानांत घुसला तेव्हां मात्र त्यांच्या छातींत एकदम धस्स झालें. अशा ठिकाणी कांहींहि घडणें शक्य होतें. त्या बाबुरावांपासून लांब राहूनच चालत होत्या. बाबुराव सिगारेट फुंकीत आपल्याच नादांत चालले होते. मध्येंच ते मोठ्यानें शीळहि घालीत होते. एक स्त्री बरोबर असतांना शीळ घालणें शोभत नाहीं असें बाबुरावांना सांगावेसें त्यांना वाटलें. पण त्या बोलूं शकल्या नाहीं.

शेवटीं 'वेस्ट व्ह्यू' हॉटेलचे आवार दिसूं लागलें तेव्हां त्यांचा जीव भांड्यांत पडला. आवारांतून जातांना नेमकें बाळासाहेबहि आपल्या बंगलीच्या व्हरांड्यांत उभे असलेले त्यांना दिसले. बाळासाहेबांसारख्या सज्जन गृहस्थानें अशा अंधारांत बाबुरावांसह फिरायला गेलेले आपल्याला बघावें ह्या गोष्टीची अहिल्याबाईंना अतिशयच लाज वाटली. बाबुराव मात्र निःशंकपणें ओरडले, 'काय हो, तुम्ही बाहेर पडला नाहींत वाटतं कुठे ?'

'नाहीं हो, थंडी कोण पडली आहे ! मी इथंच शेकत बसलो आहे. शिवाय हीं बरोबर आणलेली पुस्तकंहि वाचून संपवावयाची आहेत. तुम्हीं दोघं फिरायला गेला होता काय ?' बाळासाहेबांनीं खोचून विचारले.

'नाहीं हं,' अहिल्याबाई तत्परतेनें स्पष्टीकरण करीत म्हणाल्या, 'मी एकटीच गेले होते. मला हे वाटेंत भेटले. मग भेटल्यावर काय बरोबर येऊं नका म्हणायचं ?'

'तरीपण असं एकटं जंगलांत रात्रीच्या वेळीं जाणं बरं नव्हे,' बाळासाहेब गंभीर होत बोलले. बाबूरावांनीं सिगारेटचा झुरका मारीत

मिस्कीलपणें त्यांच्याकडे हंसून पाहिले. शेवटी होऊं नये तें झालेंच. अहिल्याबाई शेजारच्याच बंगल्यांत उतरल्या आहेत हें त्यांना दिसलेंच. बाबुरावांसह एक संध्याकाळ नाइलाजानें घालविल्याबद्दल अहिल्याबाईंना मनापासून पश्चात्ताप झाला. तें बाळासाहेब किती विद्वान आहेत ! सारखे वाचीत बसलेले असतात. हा मनुष्य अगदीं उडाणटप्पु दिसतो मात्र ! अन् कसा बाई कड्यावरून खाली पठारावर उतरला होता ! माकडच आहे मेलं ! अहिल्या-बाईंच्या मनांतून बाबूराव पायरी पायरीनं उतरत होते, नी बाळासाहेबांचें स्थान उंचावत होते.

दुसऱ्या दिवशीं नाश्त्याच्या वेळीं पुन्हां ते तिघेहिजण भोजनगृहांत एकत्र आले. बाबुरावांची आचरट बडबड चालू होतीच. बाळासाहेब ऐकलें न ऐकलेसें करून आपला नाश्ता व्यवस्थित खात होते. नाश्ता आटोपून ते तिघेहि बरोबरच उठले तेव्हां अहिल्याबाई बाळासाहेबांना म्हणाल्या, 'आपल्याकडे कांहीं चांगली पुस्तकें असली तर मला हवी होती !' 'अवश्य घेऊन जा,' बाळासाहेब सौम्य नी सौजन्ययुक्त स्वरांत म्हणाले, 'माझ्याकडे तत्त्वज्ञानावरची कांहीं उत्कृष्ट पुस्तकं आहेत. सध्या मी सौंदर्यशास्त्राचाहि अभ्यास करतो आहे. आपल्याकडील टीकाकारांचा या विषयाचा अभ्यास अगदी सामान्य स्वरूपाचा आहे. त्यामुळें आपल्या टीका करण्याच्या पद्धतींत शास्त्रशुद्धपणा नसतो.' 'असं का ?' अहिल्याबाई आदरयुक्त स्वरांत म्हणाल्या, 'मला हा विषय अगदीं नवा आहे. आमचं सगळं लक्ष शिक्षणशास्त्राकडे आहे ?'

'अहो, सर्व शास्त्रांचा समन्वय करता येणं हेंच शेवटीं आपल्याला शिकायचं आहे,' बाळासाहेब व्याख्यानाचा शेवट करीत असण्याच्या सुरावर बोलले, 'आपण या ना एकदां—इथं आहांत तोवर. आपण बसून चर्चा करूं.'

बंगलीकडे परत जातांना अहिल्याबाईंनीं मनाशी ठाम ठरविलें होतें कीं ह्यापुढें शक्य तो बाळासाहेबांसह चर्चा करण्याचा प्रसंग दवडावयाचा नाहीं आणि ह्या टोळभैरवाला शक्य तो आपल्यापासून दूर ठेवावयाचें. दुपारीं चहा आटोपल्यावर त्यांनीं रीतसर सखूबरोबर आपण येत असल्याचा निरोप धाडला आणि त्या बाळासाहेबांच्या बंगलीवर गेल्या. तेथें दोघांनीं शास्त्रशुद्ध चर्चा आरंभिली ती अंधार पडला तरी आटोपली नव्हती. बाळासाहेबांनीं वरचेवर अनेक ग्रंथांतले संदर्भ काढून दाखविण्याचा क्रम चालविल्यानें अहिल्याबाईंना त्यांच्या मतांचा केवढा आधार आहे याची खात्री पटत गेली. त्यांची चर्चा चालू असतांनाच बाबुराव फिरून परत येत होते. बाळासाहेबांना अहिल्याबाईंसह चर्चा करतांना पाहून ते म्हणाले, 'अरे वा, तुमची बैठक रंगलेली दिसतेय् बरंच !'

'तुम्हीं आला असता तर तुमच्या कानावरहि चार चांगले शब्द पडले असते,' अहिल्याबाई म्हणाल्या.

'त्यांना काय समजणार त्यांतलं ?' बाळासाहेब तुच्छतेनें हसून म्हणाले.

'हो बाबा, आपण कबुल करतो आपल्याला नाहीं समजत त्यांतलं कांहीं ! मी फारसं वाचीतहि नाहीं. मला नाद आहे भटकायचा.' बाबुराव हातांतल्या रानफुलांच्या गुच्छाचा वास घेत बोलले, 'पण तुमच्या सहवासांत थोडं ज्ञान मिळावं अशी इच्छा मलाहि वाटते बरं का ! मग असं का करीत नाहीं. उद्यां दुपारी तुम्ही दोघे चहाच्या वेळीं माझ्याच बंगल्यावर या ! चालेल ना ? मग ठरलं— नक्की ठरलं बरं का !'

नको असलेले बाबुरावांचें आमंत्रण उद्या कसें टाळता येईल याचाच विचार रात्रीं झोपतांना अहिल्याबाईंच्या डोक्यांत होता. ह्या माणसाची अर्थशून्य बडबड चालू असतांना बाळासाहेबांशीं आपल्याला धड बोलताहि येणार नाहीं. काल ह्या उनाड माणसा-बरोबर घालवलेली निष्फळ संध्याकाळ नि आज त्या विद्वान पुरुषांसह घालविलेली उपयुक्त संध्याकाळ ह्या दोहोंची तुलना करता करता त्यांना कधी झोप लागली तें त्यांचें त्यांनाहि समजलें नाहीं. मध्यरात्री त्यांना जाग आली ती कुठल्याशा विचित्र आघातांचा आवाज ऐकूनच.. बंगल्याच्या छपरावर कांहींतरी धपधप असा आवाज येत होता. मध्येंच खिडकीवरहि कुणीतरी टकटक केल्याचा भास होई. बाहेर वारा सोसाट्यानें सुटला होता. शेवटी तर व्हरांड्यांतच कुणीतरी फिरत असल्याचा भास त्यांना झाला. अहिल्याबाई मनांतून विलक्षण घाबरल्या होत्या. एक विचित्र संशय त्यांच्या मनांत डोकावू लागला. शेवटीं कसाबसा धीर गोळा करून त्या उठल्या आणि दार किलकिले करून त्यांनीं हळूच बाहेर डोकावून पाहिले. व्हरांड्यांतल्या टेबलावर दोन माकडें येऊन बसली होती. ती त्यांना व्हरांड्यांत जळत असलेल्या दिव्याच्या मंद प्रकाशांत दिसली. सुटकेचा निश्वास सोडून त्या आत आल्या. तो विचित्र संशय मनांत येऊं दिल्याबद्दल त्यांना स्वतःची काहींशी शरम वाटली. बाबु-रावांचा सतत तिटकारा करीत राहणें आपल्याला शोभत नाहीं असेंहि



" हिज मास्टर्स व्हाईस "

त्यांना वाटलें. तरीपण आदर वाटण्याजोगे त्या माणसांत कांहींहि नाहीं असाच निर्णय त्यांच्या मनानें अखेरीस दिला.

शेवटी कांहींहि सबब न सापडल्यानें दुसऱ्या दिवशी दुपारीं त्यांना बाबुरावांच्या बंगल्यावर जावेंच लागलें. बंगल्यांत येऊन त्या पोचल्या तेव्हां बाबुराव मांडीवर एक स्केचबुक घेऊन त्यावर कांहींतरी रेखाचित्रें काढीत बसले होते. अहिल्याबाई येताच हसून त्यांनी म्हटले, ' काय, कसं काय आलंय माझं ' स्केच ' सांगा पाहूं ? ' अहिल्याबाईंनी त्यांनीं पुढें केलेलें स्केचबुक हातांत घेऊन पाहिले. समोरच्या तुटत गेलेल्या पठाराचे, पठारावरील उंच सुरूंच्या झाडांचे आणि त्यामागील डोंगराळ पार्श्वभूमीचे ते धावत्या रेषांमध्यें रेखाटलेले एक पुसट चित्र होतें. ' ठीक साधलं आहे, ' अहिल्याबाई बेतानें शेरा देत म्हणाल्या. ' आम्हाला बुवा एवढंच सौंदर्य समजतं तुमचं तें सौंदर्यशास्त्र ! खोडकरपणे हंसून ते म्हणाले, ' पण हें पहा तुमचें सौंदर्यशास्त्र आलेंच ! समोरून बाळासाहेब धीरगंभीर चालीनें येत होते. बाळासाहेब येताच बाबुरावांनी चहा मागविला. ' काय, कसं वाटलं काल दिलेलं पुस्तक ? बाळासाहेबांनीं विचारलें. ' अजुन वाचलं नाहीं मी तें, ' अहिल्याबाई शरमिंद्या होत म्हणाल्या. ' अरेरे, अजुन वाचलं नाहीं ते तुम्ही ? मी तर काल रात्रभर वाचीत होतो ' ' अन् मी काल रात्री कड्यापर्यंत फिरायला गेलो होतो, ' बाबुराव म्हणाले. ' इतक्या वावटळींत फिरायला गेला होता ? ' अहिल्याबाई मनांतून वाटलेले किंचितसें कौतुक प्रयासानें झाकीत म्हणाल्या, ' वावटळींत फिरायला जाण्यातच खरी मौज असते, ' बाबुराव म्हणाले. तेवढ्यांत वेटर चहा घेऊन आला. बाबूराव चहा ओततात न ओततात तोच मागल्या रानांतून माकडांचा एक थवाच्या थवा हॉटेलच्या आवारांत घुसला. त्यांतला एक हुप्या तर थेट व्हरांड्यामधल्या लाकडी कठड्यावर येऊन बसला. त्याला पहाताच अहिल्याबाई आणि बाळासाहेब घाबरून उठू लागले. ' अहो घाबरतां काय ? ' बाबुराव खो खो हंसत म्हणाले, ' घाबरल्यासारखं निदान दाखवूं नये. त्यानें माकड अधिक चेकाळतं ! ' असें म्हणून त्यांनीं बशींतलें एक बिस्कीट त्या गलेलठ्ठ माकडाकडे फेकले. त्यानें तें लीलेनें झेलले आणि तें तोंडांत कोंबून डोळे मिचकावीत ते पुन्हा बिस्कीट मिळण्याची वाट पाहूं लागलें. अहिल्याबाईनीं माकडाकडे घाबरून पहात पहात बशींतलें बिस्कीट उचलले. त्याबरोबर तें माकड एकदम झेप टाकून त्यांच्या अंगावर आलें आणि त्यानें त्यांच्या हातांतल्या बिस्कीटाशीं झोंबाझोंबी करावयाला सुरुवात केली. अहिल्याबाईनीं भीतीनें एक मोठी किंचाळी फोडली नी त्या खुर्चीतून मागें कोलमडल्याच. बाबुराव ताडकन् उठले आणि त्या माकडाच्या अंगावर धावून गेले. पण तें माकड चवताळलें होतें. त्यानें बाबुरावांचे मनगट पकडून आपल्या तीक्ष्ण दातांनी त्यांना चावा घेतला. त्याबरोबर बाबुरावांनीं त्या जाडजूड माकडाची गर्दन दोही हातांनी जोरानें दाबली नी त्याला उचलून दूर भिरकावून दिलें. तेव्हां तें माकड रागानें गुरगुरत लांब निघून गेले. हा सारा प्रकार चालू असतांना बाळासाहेब मात्र आपला चहा तसाच टाकून गुपचुप पळून गेले होते. पण सखू आणि हॉटेलमधले एक दोन नोकर मात्र धावून आले. नोकरांनी काठ्या आपटीत माकडांना लांब हाकलून दिले. बाबुरावांना त्या हुप्यानें जबरदस्त चावा घेतला होता नी जखमेंतून रक्ताची धार लागली होती. अहिल्याबाई अगतिकपणें त्या जखमेकडे पहात उभ्या राहिल्या होत्या. पण सखू मात्र चटकन् पुढें आली नी तिनें पदराची धांदोटी फाडून बाबुरावांची जखम म्हणता म्हणता घट्ट बांधून टाकली. ' एवढ्यानें भागणार नाहीं, ' बाबुराव म्हणालें, ' मी डॉक्टरकडे जातो आत्तांच्या आत्तां. तुम्ही घाबरूं नका अहिल्याबाई, जरा जाऊन स्वस्थ पडा. '

बंगल्यांत परत येतांना सखू म्हणाली, ' कसं वं त्यांनीं माकडाला उडवून लावलं, नाहींतर बाई त्या माकडानं तुमालाच काईपन केलं असतं. आन् ते मेलं भ्याड, माकडाला पगून पळून ग्येलं ! '

सखू बोलत होती तें खरें असल्याबद्दल अहिल्याबाईंना फार वाईट वाटत होते. बाबुरावांच्या हातातून रक्ताची धार गळत असतांना आपण मख्खपणें उभ्या होतो हें आठवून त्यांना स्वतःचा रागहि येत होता. हें सारें झाल्यावरहि बाळासाहेबांनीं डुंकून चौकशीलाहि येऊं नये ह्याचें त्यांना नवल वाटत होतें. माकडाला घाबरणाऱ्या विद्वान पुरुषाचा त्यांना त्याक्षणीं तिटकारा वाटला. रात्री जेवावयास भोजनगृहाकडे जाण्यापूर्वी त्या बाबुरावांना बोलवावयासाठीं त्यांच्या बंगल्याकडे वळल्या. पण बंगल्यांत शुकशुकाट दिसला. तेव्हां त्या तशाच भोजनगृहाकडे गेल्या. त्यांनीं वेटरला विचारलें तेव्हां तो म्हणाला, ' साब तो अभी चले गये,' ' गेले ? कसे ? केव्हां ? ' अहिल्याबाई ऑफीसमध्यें जाऊन चौकशी करूं लागल्या तेव्हां त्यांना समजलें की अचानक तार आल्यामुळें बाबुरावांना जाणें भाग पडलें.

हें ऐकून आपल्याला वाईट का वाटत आहे हेंच अहिल्याबाईंना समजेना. क्षणभर त्यांना रुखरुख वाटली कीं बाबुरावांनीं जातांना आपणाला सांगायला हवें होतें. दुसऱ्याच क्षणीं मनाला सावरीत त्या पुटपुल्या ' काय म्हणून ? मला त्यांनीं सांगावें असें मी त्यांच्यासाठीं कांहीं केलें थोडेंच ? उलट त्यांच्या सभ्यपणाबद्दल आपण गलिच्छ शंका घेतली ' हें नेमकें त्याच क्षणीं त्यांना आठवलें.

जेवण आटोपून बंगल्यावर परत येताच, त्या सखूला म्हणाल्या, ' सखू, सामान बांध. आपण उद्या सकाळीच निघायचं ! '

' का वं ? ' सखू अचंबा करीत म्हणाली.

' नको ग ! इथं आता रहावंसंच वाटत नाहीं. का कुणास ठाऊक ! '

सामान आवरता आवरता सखूनें विचारलें, ' बाई, हें त्या सायबांचं बुक हेतंच राह्यलं की वं ? '

' फेकून दे खिडकीबाहेर, ' अहिल्याबाई फणकऱ्यानें म्हणाल्या, ' असभ्य मेला ! '

• • •




# स्त्रिया आणि वाचन

— बाळ सामंत

परवां मी एक गंमतीदार बातमी वाचली—
—' भारतांत म्हणे माणसाच्या आठपट उंदीर आहेत. '

यावर भाष्य करतांना एक मंत्री महाशय म्हणाले, " माझ्याहि घरांत आठपट उंदीर आहेत." ही बातमी मी बायकोला वाचून दाखविली आणि म्हटलं " आपण म्युनिसिपालिटीचा एक सांपळा आणूया. " माझ्या सूचनेचं स्वागत होत नाहीं असं पाहून मी आणखी एक विधायक सूचना मांडली. " आपण मांजर पाळूंया. "

मांजराचं नांव काढल्यावर ती चवताळली. अगदीं फिसकारून म्हणाली, " कशाला हवीय मांजरांची अडगळ ? "

" अग त्या उंदीरांनीं माझ्या पुस्तकांचा सत्यानाश चालवला आहे. मी म्हटलं.

पुस्तकं म्हटल्यावर तिची तळपायाची आग मस्तकाला गेली. ती चिडून म्हणाली. " होऊं दे त्या ( मेल्या ) पुस्तकांचा सत्यानाश. घरांत बसायला जागा नाहीं, नुसतं रद्दीचं दुकान झालंय. "

पुस्तकांची तुलना रद्दीशीं करण्याची माझ्या बायकोची कल्पना मंजूर नसल्यामुळें मी हें मूषकपुराण आवरतं घेतलं. पुस्तकाचं नांव काढलं कीं साऱ्याच बायका अशा चवताळतात कीं काय नकळे. अनेक पुस्तकांचं अंतरंग आणि बहिरंग स्त्रियांशिवाय पूर्ण होत नसलं तरी स्त्रियांचं अंतरंग काबिज करण्याचं तंत्र बिचाऱ्या पुस्तकांना साधलेलं नाहीं हें खरंच.

आमच्या घरीं पुस्तकांना तोटा नाहीं तसा वर्तमानपत्रांना आणि मासिकांना तोटा नाहीं. रद्दीच्या दृष्टीनें माझ्या बायकोला कोणत्याहि खास अंकाबद्दल प्रेम वाटतं. मराठींत आजकाल वजनदार मासिकच नाहीं अशी तिची रोजचीच तक्रार आहे. त्या मानानें मराठी वर्तमानपत्रापेक्षां टाईम्स सारखीं भार-दस्त वर्तमानपत्रें तिला फार आवडतात. टाईम्सच्या या वृत्तविषयक अथवा ' तौलनिक ' मोठेपणामुळें ती मुलांना टाईम्सला हात लावायला देत नाहीं. टाईम्सचे एकावर एक ठेवलेले महिन्याचे अंक पाहून तिचं भान हरपतं. त्यामानानें मराठी वृत्तपत्रांचा दर्जा सर्वच दृष्टया ' हलक्या ' प्रतीचा आहे असें तिचें अनुभवजन्य मत झालें आहे. कांहीं झालं तरी मराठी वृत्तपत्रें इंग्रजी वृत्तपत्रांशीं बरोबरी करूं शकणारच नाहींत अशी तिची त्रिकालाबाधित खात्री आहे. निरनिराळ्या वकिलातीं मार्फत येणारे ' वार्ताहर ', प्रेसनोटस् या वाङ्मयाबद्दलहि तिला मुळींच अनादर नाहीं. या साहित्याबरोबर येणाऱ्या पिशव्या अनेक वेळां बाजारहाटीला उपयोगी पडतात असें पाहून अमेरिका आणि रशिया या राष्ट्रांच्या परराष्ट्रीय धोरणाबद्दल तिचें फार अनुकूल मत झालें आहे.

मराठी वृत्तपत्रें ' हलक्या ' प्रतींचीं असलीं तरी त्यांतील अग्रलेखादि गंभीर मजकुराबाबत तिचें फार प्रतिकूल मत आहे. वृत्तपत्रांत मजकुरापेक्षां जाहिरातीच अधिक वाचनीय असतात आणि अधिक वाङ्मयीन असतात असा तिचा दावा आहे. विशेषतः सिनेमाच्या जाहिरातींवर तिचें अधिक प्रेम आहे. नवरा दमूनभागून घरीं परत आला कीं त्याला सिनेमाच्या जाहिराती वाचून दाखविण्याचा तिचा नेहमींचाच क्रम आहे. नटनटींची नामावली ऐकून माझं डोकं उठलं कीं मी नक्कीच सिनेमाला यायला कबूली देणार असा तिचा यशस्वी तर्क असतो. तो सिनेमा परवडला पण जाहिराती आवर, अशी विनवणी करीत दिलीपकुमार आणि मधुबाला यांच्या दर्शनाला मला जावंच लागतं.

बायकांना वाचायचा कंटाळा असला तरी आपल्याला वाचायची खूप आवड आहे असं प्रदर्शन करायची हौस असते कीं काय नकळे. कारण आमच्या चाळींतल्या सगळ्या बायका आमच्या घरांतले महिन्यांचे अंक हातोहात पळवीत असतात. मात्र परत येतांना त्यांची कव्हर फाटलेली असतात आणि तेल हळदीचे डाग आणि हिंगमिऱ्याची फोडणी घेऊन हे अंक घरीं साभार परत येतात. सकाळीं ऑफिसांत जाणाऱ्या प्रत्येक विदुषीकडे पर्सप्रमाणें एक मराठी मासिक असलंच पाहिजे असा एक नवा संकेत आजकाल रूढ होऊं लागला आहे. ज्या भगिनींना मासिकं बाळगायची आवड नाहीं त्या भगिनी लायब्ररीचं एखादं पुस्तक बाळगत असतात.

अलीकडे लग्नाच्या प्रसंगीं पुस्तकें भेट देण्याची टूम निघाली आहे. काटकसरीच्या आणि वाङ्मयप्रसाराच्या दृष्टीनें पुस्तकांची भेट देणें आमच्या बायकोला नेहमींच पसंत असते. मात्र यांत थोडासा पक्षपात केल्याशिवाय तिला राहावत नाहीं. तिच्या माहेरच्या माणसाचं कुणाचं तरी लग्न असलं तर स्टेनलेस स्टीलचं वजनदार भांडं हा अहेर आणि माझ्या माहेरचं असलं अगर माझा एकादा साहित्यिकमित्र असला कीं त्याला दीड रुपयापर्यंत एखादं पुस्तक. अहेराच्या या संदर्भात तिला कादंबरीसारख्या थिल्लर आणि फार



किंमतीच्या वाङ्मयावर तिचा फार कटाक्ष आहे. त्यापेक्षां एखादा नवकवि चक्क दीड रुपयांत खरेदी करतां येतो आणि अहेर-प्रसंगीं आपल्या उच्च काव्याभिरुचीची विनासायास जाहिरात होते यामुळें मराठींतील नवकाव्याच्या एकूण श्रेष्ठ दर्जाबद्दल तिचें फार चांगलें मत झालें आहे.

मला वाटतं अघळपघळ वाङ्मयापेक्षां बायकांना सूत्रबद्ध वाङ्मय फार आवडत असावं. कारण लांबलचक कादंबऱ्यापेक्षां छोट्या लघुकथांवर त्यांचा अधिक जीव असतो. मात्र याला अपवाद नवऱ्याची पत्रं. आपण माहेरी गेल्यावर नवऱ्यानें दर दिवसाआड एक पत्र पाठवावं अशी प्रत्येक बायकोची इच्छा असते. सकाळ-पासून संध्याकाळपर्यंत आपण काय काय केलं, फडताळावरच्या डब्यांतील चिवडा संपवला कीं नाहीं, दूधवाल्याला दूध अदपावच दे म्हणून सांगितलं कीं नाहीं, पाववाल्याचा पाव बंद केला कीं नाहीं, ऑफीसांत जातांना दाराखिडक्याच्या कड्या नीट लावल्या कीं नाहीं या सर्वांचं उत्तर त्यांत रोज हवं असतं. मात्र आपलं स्वतःचं पत्र नेहमींच घाईत लिहिल्यामुळें मोजकंच असतं आणि त्याला एक ताजा कलम असा कीं वाईट अक्षरास हंसूं नये.

मला वाटतं बायकांना वाचनाचं वाकडं असण्याचं मुख्य कारण म्हणजे वाचनापेक्षां बडबडण्याचीच त्यांना फार आवड असावी. आमच्या घराशेजारीं एक मुलगी अलीकडे व्हरांड्यांत अभ्यासाला बसते. तिच्याबरोबर अभ्यासाला म्हणून तिची एक मैत्रिणही येते. आणि या दोघीजणी अभ्यासाऐवजीं सारख्या बोलत बसतात. बायकांच्या बडबडण्याचा उत्कर्ष लग्नसमारंभांत, मुंजीच्या वेळीं, ट्रीपच्या वेळीं, अगर मुलींच्या शाळेंत नेहमी आढळतो. मासळी-बाजाराचा लौकीक आरडाओरड्याबाबत जो पसरला आहे याचं कारण तिथं कोळणीचीच दादागिरी जास्त असते म्हणून. त्यामुळें बायकांच्या तोंडाला कुलुप घालण्याची युक्ति पुरुषाजवळ नसती तर जगात फार अनर्थ ओढवला असता.

• • •

दर दहा मैलांवर भाषा बदलते असा भाषाशास्त्रांतील सर्वमान्य सिद्धांत आहे. महाराष्ट्र प्रदेश या सिद्धांताला अपवाद नाहीं. भिन्न भिन्न ठिकाणीं मराठी भाषा वेगळ्याच रूपांत आढळते. पण बाह्यांग थोडेसें बदललें तरी अंतरंग कसें बदलणार ! त्यामुळें गोमंतकापासून तो नागपूरपर्यंतच्या प्रदेशांतील मराठी भाषेचे हे नमूने म्हणजे मराठी भाषेनें धारण केलेले नवे प्रदेशिक अलंकार--

## भाषा मराठीच

### महादेव कोळी भाषा

'एक कुल्बी आपल्या मरनाच्या येली आपल्या समद्या सोकऱ्याक जवल वारून त्यास बोलल्लो, " बालांनो मांजे जवल तुमाला देयाला मांज्या सेतासिवाय विसरे काय नाय. आनी त्या सेताचे मिनी तुमाना सगल्याना सारके वारस केले हातीन. मांजे जवली जी काय संपाती हाय ती सगली मिनी त्या सेतात पुरलेली हाय. ती खनली ते तुमाला गवेल. " असा बोलल्लो आनी त्यानी आपला परान सोरला. मंग ते सोकरे पावडी कुदली झेऊन त्या सेतातला धावत जेले, आन दखे करता सेत खनायला लागले. त्यासनी ते सगला सेत खनला. त्यातला त्याला दरवे कयांच गवला नाय. तवा त्याना वाईट वाटला आन ते घरा जेले. मंग त्यानी त्या सेतातला भात पेरला. तवां ती जमीन चकोट खनल्यामुले त्या वरसी त्या सेतातला वर्सापक्षी भात मोप ऐला. तवां ते सोकरे बोलले ' आपल्या बाबांनीं सेतातला दरवे पुरून ठेवला हाय ते आपून त्याची चकोट मेनत करावी म्हनूनशानी सांगला आसवा व त्या परमान आपल्यास त्याच फल गावला.

### कुणबाऊ भाषा

'एक रांडमुंडचा पोर होता, त्याला एक बय होती. ती राज्या-कर दल्कांडा कराया जात आस. ततना ती कोंडामुंडा घेऊन ये. तंवा त्या रांडमुंडच्या पोराच्या दोन गाया होत्या. तवां एक तला होता. त्या तल्यावर तो गाया चरवीत आस. तवा त्याची बय त्या तल्यावर भाकरतुकडा त्या पोरासाठना घेऊन ये. तवां त्या पोराच्या राखनांत राजान आपली गाय दिली. तवां तो पोर तल्याच्या पारीवर आपली भाकरी बसून खाताय तवां एक नांगीन आनि एक आरदल्या या दोगाचा मेल लागला. तवां त्या पोरान त्या आरदल्यावर काठी टाकलान. तंवा काठी टाकल्याबरोबर नांगीन पातालांत गेली. ती पातालांत गेल्या-बरोबर तिचा बाप पातालांत व्हता. तवां ती त्यास आसी सांगताय रांडमुंडच्या पोरान मांझेवर काठी टाकलान. तवां नांग दुसऱ्या सापास म्हंत, तुमी रांडमुंडच्या पोरास डसायला जा. तंवा थीतना च्यार साप निगालं आणि जित पोर व्हता तिथ आल, आनि त्याच्या बाटल झाल. तवां त्या पोरान च्यार पानाच च्यार दुरून लावलान आन एक गाय च्यार दुरनामंदी पाचलान. आन ते च्यार दुरून च्यार सापाच्या तोंडांत वतलान. तवां साप त्याला सांगतात. तुला नांगानी बोलवना केलाय, तूं गेल्याबरोबर नांग तुला हटकील की, नागनीनीं कसी काय येवस्था केली, ता सांग. तो तुला धनदौलत देल. तवां तूं म्हन, मना तुमची धनदौलत नको. तुमच्या हाती आंगठी हाय ती मना द्या. मंग त्यो नांगान त्या लेकीचा सात पाट काडून मुंड्या गाढवावर बसवलान, आनि तिची धींड गावातना काडलान आनि तिला हाकलून लावलान.'




वाङ्मयीन ' अफरातफर '




आजकाल मराठी साहित्यक्षेत्रांत साहित्यिकांची निर्व्याज मैत्री ही अति दुर्मिळ गोष्ट झाली आहे. उत्कट प्रतिभेचा मगदूर जितका संकुचित तितकाच अहंकार वाढत्या प्रमाणांत दिसूं लागला आहे. वृथा अभिमान आणि दुसऱ्याबद्दलची तुच्छता हा तर विद्वानांचा हक्कच ठरला आहे. अशा परिस्थितींत ४० वर्षांपूर्वी म्हणजे १९१९ च्या एप्रिल महिन्यांत मासिक मनोरंजनानें महाराष्ट्राचे सर्वश्रेष्ठ कादंबरीकार कै. हरिभाऊ आपटे यांच्या स्मरणार्थ जो खास अंक काढला, त्यांतील कविवर्य रेंदाळकरांनीं आपल्या जिवलग स्नेह्यांचें रेखाटलेलें चित्र आजहि वाचकांना हृद्य वाटेल.

# हरिभाऊंच्या सहवासांत

**— एकनाथ पांडुरंग रेंदाळकर**

पुण्याला, महाराष्ट्राला, नव्हे-साऱ्या हिंदुस्थानला आपल्या अपूर्व लेखनकौशल्यानें भूषणभूत होऊन राहिलेले अत्यंत प्रतिभासंपन्न कादंबरीकार श्रीयुत हरि नारायण आपटे हे आज आपल्यांतून निघून गेले आहेत! या थोर पुरुषाशीं, त्याच्या अखेरच्या कालांत प्रस्तुत लेखकाचा अतिशय निकट संबंध आला असून त्याचा हा सर्व काल फार सुखाचा, आनंदाचा आणि उत्साहाचा असा गेला आहे. हरिभाऊनीं प्रस्तुत लेखकाला जरी आपल्या मित्रमंडळांत स्थान दिलें होतें, तरी वास्तविक हा संबंध मित्रत्वापेक्षां बंधुत्वाचा होता. प्रस्तुत लेखक त्यांना आपल्या वडील भावाप्रमाणें आजवर मान देत आला असून त्याच्यावर हरिभाऊंचें वात्सल्यपूर्ण प्रेम होतें. हरिभाऊंशीं माझा हा जो विशिष्ट संबंध होता त्यामुळें मला त्यांच्या बाह्यचरित्रापेक्षां अंतश्चरित्राशीं परिचित होण्याचे फार प्रसंग आले, आणि माझ्या या आठवणींत अशा दृष्टीनेंच त्यांचें खासगी चरित्र व त्यांचे मनोगत विचार वाचकांना आढळून येतील.

या आजारांतून बरे होतांच, किंवा थोडें बरें वाटतांच त्यांचें आणि माझें लोणावळ्यास रहाण्याचें ठरलें होतें, आणि तेथें आपल्या सर्व अपूर्ण राहिलेल्या कादंबऱ्या पुऱ्या करावयाच्या व आपलें 'आत्मचरित्र' लिहावयाचें हा त्यांचा अगदीं निश्चय झाला होता. हा त्यांचा बेत शेवटास गेला असता, खास त्यांच्या हातून त्यांचें आत्मचरित्र लिहिलें गेलें असतें, तर तो महाराष्ट्रास अपूर्व लाभ झाला असता; पण तो योग नव्हता. तसला ग्रंथ निर्माण होण्याचें भाग्य महाराष्ट्रासारख्या दैवीं नव्हतें. या आजारांत ते रोज कांहीं गमतीच्या आठवणी सांगत, व रोज एकदां 'आत्मचरित्र' लिहिण्याचा निश्चय व्यक्त करीत.

अभ्यासाकडे दुर्लक्ष करूनहि ग्रंथवाचनाचा जो विलक्षण नाद हरिभाऊंना लागला होता, त्यामुळें हरिभाऊंचें वास्तविक नुकसानच व्हावयाचें; पण आपल्या विद्वान् चुलत्याचें आपण मन दुखवीत आहों, त्यांच्या मर्जीप्रमाणें परीक्षा देऊन आपल्याला त्यांना खूष करतां येत नाहीं, ही गोष्ट त्यांच्या मनाला लागून राहिली होती. प. वा. महादेव चिमणाजी आपटे हे त्या वेळचे नामांकित हायकोर्ट वकील असून त्यांनीं त्या धंद्यावर चांगला पैसा कमाविला होता. हरिभाऊंना त्यांनीं अगदीं लहानपणापासून आपल्याजवळ ठेवून घेतलें होतें. हरिभाऊंच्या वडिलांचा आणि हरिभाऊंचा आरंभापासून फारसा परस्परांकडे ओढा नव्हता. आणि पुढें पुढें हरिभाऊंच्या सुधारकी मतांनीं तर त्यांचा हरिभाऊंवर रागच झाला. हरिभाऊंच्या नाजूक मनोवृत्तीला त्यांच्या वडिलांनीं बरेच वेळां दुखविलें होतें; पण हरिभाऊ त्यांना योग्य मान देत. त्यांच्या विरुद्ध असें त्यांच्या तोंडून केव्हांच उद्गार निघाले नाहींत. मात्र एका प्रसंगाची आठवण बरीक त्यांना परवांपर्यंत खिन्न करी. रा. ब. पारसनीस हे हरिभाऊंच्या जिवलग स्नेह्यांपैकीं. ते विलायतेस जाऊन आल्यानंतर नेहमीप्रमाणें हरिभाऊंच्या वडिलांना भेटावयाला गेले, त्या वेळीं त्या तामसी ब्राह्मणानें त्यांचा अपमान करून पुनः घरीं न येण्याबद्दल त्यांना बजावलें. रा. ब. पारसनीसांना तेव्हां फार वाईट वाटलें आणि केवळ हरिभाऊंच्या वडिलांना वाईट वाटूं नये म्हणून त्यांनीं आनंदाश्रमांतहि जाणें उत्तरोत्तर कमी केलें. या विषयावर बोलत असतां हरिभाऊंना फारच वाईट वाटलें. आणि बराच वेळ ते स्तब्ध राहून नंतर मजजवळून निघूनच गेले!

विष्णुशास्त्री चिपळूणकर वारले तेव्हां त्यांच्या निधनावर कांहीं कविता प्रसिद्ध करण्याचें त्या वेळच्या फर्ग्युसनच्या विद्यार्थ्यांनीं ठरविलें. त्या वेळीं शंकर मोरो रानडे हे मोठे नाणावलेले कवि, आणि तसली कविता कांहीं तुम्हांला रचतां यावयाची नाहीं असें हरिभाऊंचे स्नेही म्हणूं लागले; पण रानड्यांप्रमाणेंच जाडेजाडे संस्कृत शब्द घालून हरिभाऊंनीं कांहीं श्लोक लिहून ते खुद्द रानड्यांकडेच पाठविले; व त्यांनींहि 'हे श्लोक अगदीं आपल्यासारखे आहेत' असा अभिप्राय देऊन कवीला शाबासकी दिली.

हरिभाऊंच्या स्वभावांत लहरी नादिष्टपणा वारंवार दिसून येई. एकदां त्यांना फोटोग्राफीचा नाद लागला; इतका, कीं, रात्रंदिवस त्यावाचून त्यांना कांहीं सुचतच नसे. आपल्या आप्तमित्रांचे फोटोवर फोटो काढून त्यांनीं

त्यांचा संग्रह केला. "आनंदाश्रम" म्हणजे एक स्टूडिओच होऊन बसला; पण पुढें हा नाद संपला. फोटोग्राफीचीं यंत्रें, निरनिराळीं उपकरणें, नंतर धूळ खात पडलीं. त्यांच्याकडे मग कोण पहातो? या निमित्तानें त्यांच्या लायब्ररींत फोटोग्राफीवरील उत्कृष्ट पुस्तकांची मात्र चांगलीच भर पडली.

हरिभाऊंची लायब्ररी आणि त्यांचा ज्ञानसंग्रह बहुविध असे. तरी पण या सर्वांची वाढ एकसमयावच्छेदानें न होतां एकेकाची होत असे, आणि त्यावेळीं बाकीचे भाग विश्रांति घेत. शेक्सपीअर, डांटे, ब्राउनिंग, मोर्ले, स्पेन्सर, यांच्याविषयींचे उपलब्ध महत्त्वाचे सर्व ग्रंथ यांच्या लायब्ररींत जमले होते. मात्र एकदां स्पेन्सर तर स्पेन्सरच. मग दुसरें पुस्तक त्यांच्या हातांत मिळावयाचें नाहीं. एकदा त्यांना बागबगीच्याचा नाद लागला होता; तर त्यावेळीं त्याच पुस्तकांचा भरणा होत होता. वर जे ग्रंथकार सांगितले हे त्यांच्या विशेष आवडीचे होते. अलीकडे स्पेन्सर किंवा डांटे थोडे बाजूला पडल्यासारखे झाले होते. शेक्सपीअरचा त्यांचा नाद अगदीं लहानपणापासूनचा होता. 'निबंधचंद्रिकें'त त्यांनीं रोमिओ आणि ज्यूलिएट व हॅम्लेट या दोन नाटकांच्या भाषांतरावर विस्तृत आणि सांगोपांग टीका केली होती. हॅम्लेटचें भाषांतर सुप्रसिद्ध लेखनपटु प्रिन्सिपाल आगरकर यांनीं केलें होतें. ही टीका वाचून आगरकरांना फार आश्चर्य वाटलें, आणि हें भाषांतर करण्यांत आपली मोठी चूक झाली, पुनः आपण शेक्सपीअरच्या कृतीला हात लावणार नाहीं, असें ते म्हणाले. शेक्सपीअरविषयींचा त्यांचा हा अभ्यास अगदीं परवांपर्यंत चालू होता. कोठें कांहीं शेक्सपीअर विषयीं आढळलें, कीं, त्यांनीं वाचलेंच. त्यांच्या मनांत शेक्सपीयरच्या सर्व नाटकांवर विस्तृत विवेचन करावयाचें होतें. चित्रमयजगत्मधील शेक्सपीयरवरील त्यांची लेखमाला या दृष्टीनेंच सुरू झाली होती. शेक्सपीयरच्या सतपद्यांचें (Sonnets) भाषांतर करण्याचें काम त्यांनीं अलीकडे हातीं घेतलें पण होतें; पण तें काम पुरें झालें नाहीं.

हरिभाऊंची इच्छा प्रबळ; पण उत्साह अलीकडे तितका राहिला नव्हता. त्यामुळें पूर्वींच्या संवयीप्रमाणें ते निरनिराळे उद्योग हातीं घेत; पण शेवटला मात्र जात नसत.

हरिभाऊंचें अपत्यवात्सल्य कांहीं अपूर्व होतें. प्रथम पत्नीपासून त्यांना एकदोन अपत्यें झालीं होतीं, पण तीं त्यांनां लाभलीं नाहींत. आनंदाश्रमांत त्यांच्या लायब्ररींत लिहिण्याच्या खोलींत त्यांच्या (मानिलेल्या) प्रियभगिनी काशीताई कानिटकर यांच्याबरोबर त्यांच्या प्रथम पत्नीची तसवीर आहे. त्यांना दुसऱ्या संसारांत लाभलेल्या मुलीविषयीं शांताताईविषयीं अतिशयच प्रेम वाटे. एकदां आम्ही चतुःशृंगीकडे फिरावयास गेलों होतों. त्या दिवशीं हरिभाऊंनां काय झालें होतें न कळे, अगदीं गंहिंवरल्या स्वरानें त्यांनीं मला शांताताईच्या कितीतरी गोष्टी सांगितल्या. तिची हुषारी, तिची धारणा, तिचा प्रेमळ स्वभाव, एकना दोन, ते तिच्या गुणांचें कीर्तनच करीत होते. प्रत्येक प्रेमळ पित्याला आपलें अपत्य सर्वगुणसंपन्न वाटतेंच, तरीसुद्धां हरीभाऊंनां इतकी आनंदस्थान होऊन राहिलेली ही मुलगी त्यांनां लाभली असती तर फार बरें झालें असतें. खात्रीनें तिच्या मरणानें कांहींसें वाङ्मयाचें नुकसान झालें आहे, यांत शंका नाहीं. सुमारें एक वर्षभर तरी हरिभाऊंशीं अगदीं वेड्यासारखी स्थिति झाली होती; आणि पुढेंसुद्धां तिच्या आठवणीनें उत्पन्न होणाऱ्या उदासीनतेनें पुष्कळ वेळां त्यांनां कर्तव्यविन्मुख केलें आहे. त्यांनां वारंवार मुंबईला जावें लागे, तेव्हां पुष्कळदां ते तिला आपल्याबरोबर घेऊन जात; आणि एकटे गेले तर काम संपतांच मिळेल त्या पहिल्या गाडीनें ते पुण्याकडे धांव घेत. इतका कांहीं त्यांना तिचा नाद लागला होता. ती थोडीशी आजारी झाली तर तिची प्रत्येक व्यवस्था ते आपल्या हातीं करीत. कोणावरहि प्रत्यक्ष तिच्या आईवरहि ते विसंबत नसत. सकाळीं उठतांच कुकरवर भात करून यांनीं तिला घालावा! तिला उत्तम प्रकारचें शिक्षण देऊन तिची थोरली बहीण—'करमणूक'—तिच्यावर सोंपविण्याचा त्यांचा विचार होता, पण मानवी आशा कितीशा शेवटास जातात!

पुण्यास नुकतीच इन्फ्लुएन्झाची साथ येऊन गेली त्यावेळीं तर हरिभाऊंनीं इतके श्रम घेतले, कीं, त्यांचा त्यांच्या प्रकृतीवर फारच वाईट परिणाम झाला, आणि त्यांचा असा अकालीं अंत होण्यास ते श्रम कारणीभूत झाले. या सांथीच्या वेळीं घरोघर जाऊन विपन्न माणसांना त्यांनीं अतिशय मदत केली. आणि रोग्यांसाठीं हॉस्पिटल उघडण्यास त्यांनीं इतके श्रम—अव्याहत श्रम केले कीं, चार दिवस लागोपाठ त्यांना पांच मिनिटेंहि झोंप घेण्यास फावलें नाहीं! हरिभाऊंची प्रकृति वरवर पहाणारास जरी फारशी वाईट दिसत नसे, तरी अगदीं जवळ असणारांना तो नुसता दिखाऊ डोलारा आहे, हें ठाऊक होतें. आज काय अंगच दुखूं लागलें, उद्यां काय तापच आला, हें त्यांचें वारंवार सुरू झालें. त्यांना हृदयाचा विकार असल्यामुळें सर्वांना नेहमीं भीति वाटेच. १९१८ च्या आक्टोबर नवंबरांत त्यांच्या एका डोळ्याची पापणी खालीं पडून दृष्टिहि कमी झाली. त्यांचा एक डोळा तर पुष्कळ दिवसांपूर्वी गेलाच होता. अर्थात पुनः परस्वाधीनासारखें होऊन त्यांना दुःख लागलें. त्या स्थितींतहि 'केवळ स्वराज्यासाठीं' ही कादंबरी माझ्या मदतीनें—अर्थात जड मदतीनें, कारण त्यांना त्या वेळीं लिहिण्याजोगें दिसत नव्हतें—प्रसिद्ध केली. आणि 'सूर्यग्रहण' प्रसिद्ध करण्याची तयारी सुरू झाली, अद्याप त्यांची दृष्टि नीट नसल्यामुळें ही कादंबरी एकवार आरंभापासून मीं त्यांना वाचून दाखविली. कादंबरी अगदीं ऐन भरांत आली



एप्रिल फूल! कोण?

असतांच तिला खंड पडला होता. शिवाय ब-याच वर्षांपूर्वी तो भाग लिहून झालेला. तेव्हां संविधानक पुढें कसें चालवयाचें याचा त्यांना नव्यानेंच विचार करणें भाग पडलें. आणि मरणापूर्वी कांहीं दिवस कादंबरीविषयीं त्यांचा विचार कायम झाला होता. थोडी शक्ति येतांच हें काम पुढें सुरू करण्याचा त्यांचा बेत होता. आपण लवकरच बरे होऊं, ही त्यांना आशा होती, आणि मलाहि तशी उमेद असल्यामुळें पुढील संविधानकाविषयीं, त्यांना बोलण्याचे श्रम होतील म्हणून मींहि विचारलें नाहीं; पण हरिभाऊंच्या कांहींशा आकस्मिक निधनानें सर्वच कारभार आटपला, आणि ती कादंबरी पूर्ण होण्याची आशा, तें सूर्यग्रहण सुटण्याची-सूर्याचा ग्रहणांतून मोक्ष होण्याची उमेद सर्वस्वी नाहींशी झाली !

हें पुस्तकांविषयींचें त्यांचें प्रेम अगदीं शेवटपर्यंत कायम होतें. मरणाच्या आठच दिवस आधीं मीं त्यांना मिल्टनची एक सुंदर प्रत आणून दिली. रोज कांहीं तरी पुस्तकें आणावयास मला ते सांगावयाचेच. बरें वाचण्याची तर शक्ति नाहीं. मग कोठें पुस्तकाचीं पानेंच फाड, त्याला पुष्टिपत्रच घाल, अशा प्रकारांत त्यांनीं वेळ काढला. पण अशीं पानें फाडीत असतांहि त्यांच्या मुद्रेवर जें समाधान दिसे तें आपल्या मुलांना कुरवाळणा-या वत्सल पित्याच्या मुखावरहि दिसत नसेल ! मी त्यांना एकदा हंसून विचारलें, "तुम्हाला या पुस्तकांकडे नुसतें पहात बसण्यांत काय मौज वाटते ?' तेव्हां तें प्रेमार्द्र स्वरानें म्हणाले, "मला हे जे शेकडों व्यवहारी लोक भेटायला येतात, त्यांच्यामुळें जो त्रास होतो तो या माझ्या आप्तांकडे पाहून पार नष्ट होतो. माझे हे अत्यंत जिवलग स्नेही आहेत. आणि सांप्रतच्या माझ्या स्थितींत यांचा नुसता सहवासहि मला फार सुखाचा वाटतो !"

हरिभाऊंची लेखणी फार चपल असे. ती नानाविषयांवर चाले, त्याचप्रमाणें ते फार झपाट्याने लिहीत. मात्र अगदीं आयत्या वेळाशिवाय त्यांच्या हातून कांहीं व्हावयाचें नाहीं, हें ठरलेलें ! आरंभापासून त्यांना आपलें सगळें लेखन स्वतः करण्याची सवय. त्यांनीं लेखक ठेविलाच नाहीं. कांहीं अडचणींमुळें त्यांना लिहिणें अशक्य झालें, आणि दुस-याला तोंडीं मजकूर सांगण्याचा प्रसंग आला तर तें त्यांना बरें वाटत नसे. त्यांना दिसत नव्हतें त्यावेळीं एकदा मी 'सूर्यग्रहण' त्यांना वाचून दाखवीत होतो; माता रणदेवी नदी-तीरावरील झाडाखालीं बसली असतां तिच्या पुत्राचा घोडा तिच्या मोहानें तिच्याकडे धांवत आला; पण त्या नीचानें-कीर्तिसिंगानें त्याच्या नाकाडावर मुष्टिप्रहार करून त्याला ठार मारलें. हा प्रसंग इतका करुणरसप्रधान आहे, कीं, मला तर थांबावेंच लागत होतें, पण हरिभाऊहि डोळे पुशीत होते. नंतर ते म्हणाले, "असले प्रसंग मला दुस-याला मजकूर सांगून कधींहि बठवतां आले नसते ! अगदीं एकांतांत मी एकटा असतांच असले प्रसंग माझ्या हातून निर्माण झाले आहेत." याचवेळीं कादंबरी रसपूर्ण होण्यास काय काय साधनसामुग्री लागते याविषयीं बोलणें चाललें असतां ते म्हणाले 'कित्येकांना वाटतें, कीं, कादंबरी आकर्षक होण्यास त्यांत शृंगाराची जरूरच आहे; पण माझ्या कादंब-यांनीं हें तत्त्व खोटें आहे हें मी सिद्ध करून दाखविलें आहे. स्त्रीविषयक प्रेमावर माझी कादंबरी केव्हांहि अवलंबून नसते."

जुन्या कवींत मुख्यतः ज्ञानेश्वर आणि तुकाराम यांच्याविषयी हरिभाऊंना अतिशय प्रेम वाटे. तुकारामाचीं त्यांनीं कितीतरी पारायणें केलीं होती. मध्येंच केव्हां तरी रात्रीं किंवा पहाटे एकतारी घेऊन तुकारामाचे कित्येक गोड अभंग ते प्रेमळपणें म्हणत असत.

हरिभाऊंचा मित्रपरिवार फार मोठा होता; पण त्यांतूनहि त्यांचे कांहीं अंतरंग स्नेही असत. त्यांत प. वा. विष्णु बळवंत पंडित यांची प्रामुख्यानें गणना केली पाहिजे. पंडितांचा आणि हरिभाऊंचा अतिशयच स्नेह असे. कांहीं वर्षें पंडितांचें जेवणें, निजणें, बसणें, सर्व आनंदाश्रमांतच होत असे. नियमानें रोज एकादें नवें पुस्तक वाचावयाचें असा या दोघांचा त्या वेळचा क्रम होता. हरिभाऊप्रमाणेंच पंडितहि बहुविषयव्यासंगी होते. विद्येच्या बहुधा सर्व विषयांवरील ग्रंथ सांपडत; आणि त्यांचें वाचन कसोशीचें होतें; पण त्यांच्या अकालनिधनानें त्यांची योग्यता महाराष्ट्राला समजली नाहीं. त्यांच्या निधनानें हरिभाऊंनां अतिशय दुःख झालें, पंडितांचा सर्व ग्रंथसंग्रह आनंदाश्रमांतच असे. मित्राच्या आठवणीसाठीं हरिभाऊंनीं तो आपल्याजवळ ठेवून घेऊन त्याची किंमत त्यांनीं पंडितांच्या कुटुंबाकडे पोंचविली. आपली 'मी' ही कादंबरी त्यांनीं पंडितांनां अर्पण केली आहे.



## बाळगुटी

स्पर्शांची बाळगुटी
केसांनी पाशियली
बकुळांची लाट नवी
रक्तावर मोहरली

सरपटत्या इच्छेला
पंख पंख नवे नवे
'नको' 'नको' मधें बुडे
विरलेलें 'हवें' 'हवें'

झुरणाऱ्या पाण्याची
मिटलेली गाढ दिठी
कोसळत्या टोंकावर
फसलेली एक मिठी

दबलेल्या क्षितिजाचा
झुलणारा पूल पुढें
वीज बने तळवा पण
भडसर रक्तांत खडे !

— पद्मा लोकूर

---

पांच कोटी लोकवस्तीच्या देशांत दररोज २ कोटी पोष्टाचीं तिकिटं विकलीं जातात. म्हणजे दर अडीच दिवसांनीं प्रत्येक व्यक्तिस एक तिकीट घेणं भाग पडतं; म्हणजे एका वर्षात १४६ तिकिटं. आता एक तिकीट चिकटवण्यास दोन सेकंद लागतात असं गृहीत धरलं तर पन्नास वर्षांच्या जीवनांत ४८ तास तो नुसतीं तिकिटंच चिकटवीत असतो.

*बॉम्बेसेंट्रलहून एक ट्रंक प्रवासास निघाली. शामगढला ती ट्रंक कुणाची याची चौकशी झाली. मालकाचा पत्ता नसलेल्या या काळ्या ट्रंकेंत होतें तरी काय ? दारूच्या बाटल्या ? हिरे ? माणकें ?...त्याची ही सत्यकथा—*



# काळ्या ट्रंकेंतील रहस्य

१० सप्टेंबर १९४७ ला रात्रौ पावणे नऊ वाजतां नेहमींप्रमाणें दिल्ली एक्स्प्रेस बॉंबे सेंट्रल स्टेशनवरून निघाली आणि दुसरे दिवशीं संध्याकाळीं पांच वाजतां शामगढ स्टेशनला पोहोंचली. शामगढ हें एक मोठं स्टेशन आणि तिथें गाडीहि बराच वेळ थांबते. त्या दिवशीं गाडींत तिसऱ्या वर्गाच्या डब्यांत एक मोठी काळी ट्रंक होती. ट्रंकेचा मालक कुठंतरी बेपत्ता झाला होता. स्टेशनवरच्या हेडकॉन्स्टेबल हेमराजनें डब्यांत चौकशी केली तर असं कळलं कीं या काळ्या ट्रंकेचा मालक बॉंबे सेंट्रलला गाडींत शिरला पण पुढें दोन तीन स्टेशनानंतर वाटेंत कुठं उतरला तो परत तोंड दाखवायला आलाच नाहीं.

हेमराजनें ट्रंकेचा ताबा घेतला आणि आपल्या वरिष्ठांपुढें ती हजर केली.

ट्रंकेंतून कसली तरी दुर्गंधि येत होती, पोलिसांनीं यांत कांहीं तरी काळेबेरें असणार असा तर्क करून ट्रंक फोडली—

—त्या ट्रंकेंत एक प्रेत होतें.

पोशाखावरून तो कुणीतरी शीख तरुण असावा. अंगपिंडानें चांगला मजबूत. कसल्यातरी तीक्ष्ण शस्त्रानें त्याचा गळा चिरला होता. त्याचं पागोटं आणि अंगावरचे कपडे यावरून तो नक्की श्रीमंत असावा, निदान चांगला सुखवस्तु असावा असें दिसत होतें. पोलिसांनीं प्रेताचा ताबा घेतला आणि त्याचें छायाचित्र काढलें. स्थानिक हॉस्पिटलमध्यें प्रेताचें पोस्ट मॉर्टमहि करण्यांत आलें. डॉक्टरी तपासणींत असें सिद्ध झालें कीं मयताच्या मानेवर दहा इंच लांब आणि दोन इंच रुंद अशी खोल जखम कोणत्यातरी हत्यारानें केली गेली आहे आणि यामुळेंच त्या तरुणाला मृत्यु आला असावा.

दिल्ली एक्स्प्रेस मुंबईहून आली असल्यामुळें मयताचें छायाचित्र मुंबईच्या पोलिसांना पाठविण्यांत आलें. पण मुंबईच्या पोलिसांना मयताचा ठावठिकाणा कळेना आणि त्यांनीं तें छायाचित्र शामगढला परत पाठवलें.

त्यानंतर कित्येक महिने ट्रंकेंतील रहस्य तसेंच अज्ञात राहिलें.

पाकिस्तानमधील अत्रोताबाद या गांवाहून एक शीख कुटुंब नुकतेंच मसुरी येथें येऊन स्थायिक झालें होतें. या शीख कुटुंबांतील धनवंतसिंग आणि कुलदीपसिंग या दोन भावांपैकीं कुलदिपसिंग हा मुंबईस कामधंद्याच्या शोधार्थ आला होता. पण दोघा भावांचा पत्रव्यवहार चालू होताच. १९४७ पर्यंत या पत्रव्यवहारांत कधींच खंड पडला नव्हता. ४७ सालीं फाळणीमुळें जी दंगल उडाली त्यामुळें पोस्ट आणि रेल्वे यांच्यांत अनियमितपणा निर्माण झाला. कुलदिपसिंगकडून धनवंतसिंगाला आलेलें शेवटचें पत्र ३ सप्टेंबर १९४७ या तारखेचें. पण तें पत्र धनवंतसिंगला पोचलें मात्र २३ ऑक्टोबरला. फाळणीमुळें सर्वत्र





अनुक्रमणिका

सुरू झालेले दंगे आणि पत्र मिळायवास लागणारा भलताच उशीर यामुळें धनवंतसिंगाला आपल्या भावाबद्दल काळजी वाटूं लागली. त्याला कांहीं सुचेना आणि म्हणून तो स्वतःच भावाची खुशाली समजावून घेण्यासाठीं ३१ ऑक्टोबरला मुंबईस आला, आणि तडक आपोलोबंदरवरच्या कार्टन हॉटेलांत गेला. कार्टन हॉटेल हा त्याच्या भावाचा त्याला माहित असलेला शेवटचा पत्ता. हॉटेलमध्यें चौकशी केल्यावर त्याला कळलें कीं १० सप्टेंबरला दुपारीं त्याचा भाऊ जो हॉटेलबाहेर पडला तो अजून आलाच नाहीं. इतकंच काय पण त्या दिवसापासून त्याचा चेहेराहि कुणाच्या दृष्टीस पडला नाहीं. मात्र १० तारखेला संध्याकाळीं कुलदीप दिल्लीला जात आहे असा कुणाचा तरी फोन आला होता. हा फोन हॉटेलमधील पीटर नांवाच्या वेटरनें घेतला. याशिवाय कुलदिप दिल्लीला सुखरुप पोंचला आणि लवकरच मुंबईला परत येत आहे अशा अर्थाची एक तारही आली होती.

हा काय प्रकार आहे हें धनवंतसिंगाला कांहींच कळेना. त्यानें भावाची खोली उघडून पाहिली आणि आश्चर्य असं कीं आंत त्याचं वेडिंग वगैरे जसेच्या तसं होतं. त्याचे सगळे कपडे, टूथब्रश, टूथपेस्ट–कोणतंहि सामान हलवलं गेलं नव्हतं. एवढ्या लांबचा प्रवास वेडिंगशिवाय आणि कपड्याशिवाय आपला भाऊ कसा करणार ? यांत नक्कीच कांहींतरी गफलत असणार असा तर्क करून धनवंतसिंगानें या प्रकरणाचा छडा लावण्याचा निश्चय केला.

त्यानें खोलींत जाऊन कुलदीपचे सगळे कागदपत्र तपासले. त्या कागदपत्रावरून असें दिसून आलें कीं २८ ऑगस्ट १९४७ रोजीं कुलदीपच्या नांवावर १०००० रुपयांची राळ अबोताबादहून आली होती. त्यानें स्टेशनवर जाऊन तपास केल्यावर असें आढळलें कुलदीपसिंगानें तो माल ताब्यांत घेऊन अमरिकसिंग नांवाच्या आपल्या मित्राच्या गॅरेजमध्यें ठेवला.

हा अमरिकसिंग कुलाब्याला ३ पास्ता लेनमध्य राहात असे. अमरिकसिंगाचा ब्लॉकहि तीन खोल्याचा प्रशस्त होता. त्याचा दिवाणखाना मात्र शेजारचा पार्शी भाडेकरूंच्या वापरांत असे, या पारशाचें नांव कावसजी बांद्रावाला. अमरिकसिंग त्यावेळीं आपली बायको आणि दहा वर्षांचा एक मुलगा यांच्यासह तेथें राहात असे.

धनवंतसिंगानें अमरिकसिंगाला कुलदीप बाबत विचारलें. अमरिकसिंगानें स्पष्ट सांगितलें कीं आपल्याला त्याची कांहीं माहिती नाहीं आणि बरेच दिवसांत त्याची न् आपली गांठभेटहि नाहीं. राळेबाबतहि आपल्याला कांहींहि माहिती नाहीं असें त्यानें सांगितलें. हीं उत्तरें ऐकल्यावर धनवंतसिंगाचा धीर सुटला आणि त्यानें सरळ कुलाबा पोलीस स्टेशनवर जाऊन आपला भाऊ १० सप्टेंबरपासून नाहींसा झाला असल्याची वर्दी दिली. कुलाबा पोलिसांनीं त्याला मुंबईच्या क्राइम ब्रँचकडे पाठवलें. क्राइम ब्रँचनें त्याला अशी माहिती दिली कीं ११ सप्टेंबर १९४७ रोजीं शामगढ स्टेशनवर ट्रंकेंत एका शीख तरुणाचें प्रेत सांपडलें. त्या प्रेताचा फोटोहि मुंबईला पाठविण्यांत आला होता तो परत शामगढला पाठविण्यांत आला. तेव्हां क्षणाचाहि विलंब न लावतां धन वंतसिंग शामगढला गेला. त्यानें आपल्या भावाचा फोटो ओळखला. त्या ट्रंकेंतील कपडे, बूट हे आपल्या भावाचेच हेहि त्यानें ओळखलें. ३ डिसेंबरला धनवंतसिंगानें पोलिसांसमोर जबानी दिली आणि त्यांनीं खुनाची केस म्हणून त्याची नोंदणी करून तपासाला सुरवात केली.

१२ डिसेंबरला अमरिकसिंगाची हजेरी घेण्यांत आली आणि १६ तारखेला त्याला पोलिसांनीं अटक केली. किसन नांवाच्या त्याच्या नोकरालाहि पकडण्यांत आलें. त्याचा दुसरा नोकर रामशरण हा कुठेंतरी बेपत्ता झाला होता तो पोलिसांना सांपडला नाहीं. आणखी तपास केल्यावर अमरिकसिंगाच्या फोर्ट मधील कचेरींत पोलिसांना एक पिस्तूलहि सांपडलं. अमरिकसिंगाच्या ब्लॉकमधील स्वयंपाकघरांत एक कानस आणि एक सुराहि पोलिसांना मिळाला. नोकर किसननें पोलिसांना असें सांगितलें कीं अमरिकसिंगानें एक काळी ट्रंक हातगाडीवरून कुलाबा टॅक्सी स्टँडवर नेली. पोलिसांनीं त्या हात गाडीच्या मालकाचा म्हणजे कोंडाजीचा तपास लावला व त्यानेंहि अशी जबानी दिली कीं कांहीं महिन्यापूर्वी अमरिकसिंगाच्या ब्लॉकमधून एक काळी ट्रंक आपण व्हिक्टोरियागाडीपर्यंत नेली,

इन्स्पेक्टर सानी यांचे सहकारी सबइन्स्पेक्टर साळवी यांनीं आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्याच्या सूचनेनुसार अमरिकसिंगाच्या ब्लॉकची पूर्णपणें झडती घेतली. त्या झडतींत् असें दिसून आलें कीं दिवाणखान्याच्या खिडकीवर आणि कोपऱ्यांतील नळावर रक्ताचे डाग आढळले. या डागाचे नमूने केमिकल ॲनलायझरकडे पाठवले गेले आणि त्यांनीं असा अभिप्राय दिला कीं नळावरचे रक्ताचे डाग हे माणसाच्या रक्ताचेच डाग आहेत. पण खिडकीवरचे रक्ताचे डाग फार जुने असल्यामुळें ओळखणें कठीण गेलें. अमरिकसिंगाचा शेजारी बांद्रावाला यानें पोलिसांना असें सांगितलें कीं अमरिकनें त्याच्याकडून १० सप्टेंबरला दुपारीं ५ वाजतां २० रुपये उसने घेतले होते. कोंडाजीनेंहि अमरिकचा ब्लॉक शोधून काढला आणि ती काळी ट्रंकहि आपणच व्हिक्टोरियापर्यंत नेली होती असें सांगितलें.

अमरिकसिंगानें ती राळ ज्या माणसाच्यामार्फत विकली होती त्या माणसाचें नांव नूर महंमद. त्यानें पोलिसांना असें सांगितलें कीं अमरिकसिंगाच्या सांगण्यावरून आपण नारायण इंपोर्ट ॲन्ड एक्स्पोर्ट कं. च्या नांवची लेटरहेडस् छापून घेतली आणि त्या कंपनीच्या मार्फत ती राळ १०००० रु. ला विश्राम खिमजी या फर्मला विकली. या घटनेनंतर अमरिकसिंगानें कुलाब्यांतील एका फर्नीचरमेकरला आपला सोफा सेट विकला असेंहि पोलिसांनीं उघडकीस आणलें.

अमरिकसिंगाचा एक नोकर रामशरणदास हा जम्मू येथें पळून गेला होता. मार्च १९४८ मध्यें सबइन्स्पेक्टर साळवी हे जम्मू येथें गेले आणि त्यांनी मोठ्या शिताफीनें रामशरणला २३ मार्चला अटक केली. रामशरणला पोलीस कोठडींत रवानगी करण्यापूर्वी जम्मू येथील फर्स्टक्लास मॅजिस्ट्रेटसमोर त्याची जबानी घेण्यांत आली. रामशरणला अटक करण्यांत आली त्यावेळीं दिल्ली येथून पाठविण्यांत आलेल्या २३ तारखेच्या तारेची रिसिटहि त्याच्याजवळ सांपडली. याशिवाय रामशरणनें जम्मूला आल्यावर थोड्याच दिवसांत एक रिस्टवॉच बाळकृष्णन् नांवाच्या माणसाला विकल्याचें आढळून आलें. (अधिक तपासाअंती मयत कुलदिपसिंग वापरीत असे तें हेंच घड्याळ असें सिद्ध झालें.) रामशरणनें

पोलिसांसमोर अशी जबानी दिली कीं अमरिकसिंगाच्या सांगण्यावरून आपण एका पिस्तुलाच्या साहाय्यानें कुलदिपसिंगाला ठार मारलें. त्यानंतर तो आणि मालक खालीं रहात असलेल्या एका साहेबाकडे गेले आणि त्याच्याकडून उसने पैसे घेऊन त्यांनीं एक काळी ट्रंक विकत आणली, त्या ट्रंकेंत कुलदीपचें प्रेत ठेवलें आणि एका हमालाकडून ती ट्रंक खालीं नेली. रामशरण ती ट्रंक घेऊन मुंबईच्या पुढें एका स्टेशनापर्यंत गेला आणि नंतर परत आला. या पुराव्याप्रमाणें पोलिसानीं तीनहि आरोपींवर कुलदीपसिंगाचा खून करणें आणि त्याच्या मालकीच्या राळेची अफरातफर करणें असे आरोप ठेवले.

हा खटला प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट बी. के. मुरंजन यांच्यासमोर चालला. त्यांनी ती केस सेशनकमिट केली. नऊ ज्यूरी आणि सेशन्स जज्ज श्री. एम्. वी. होनावर यांच्यासमोर तो खटला चालविण्यांत आला, न्यायाधीशांसमोर दोन्ही बाजू मांडण्यांत आल्या. फिर्यादी पक्षाची सर्व बाजू परिस्थितिजन्य पुराव्यावर आधारलेली होती. आणि ह्या परिस्थितिजन्य पुराव्याची छाननी करून आपला निर्णय देणें ज्यूरीच्या स्वाधीन होतें.

आपला बचाव करतांना आरोपी अमीरकसिंगनें सांगितलें कीं ' राळेच्या कांहीं डब्यासाटीं मी माझ्या मित्राचा खून कां म्हणून करीन ? ' २८ ऑगस्टपासून राळेचे डबे त्याच्या ग्यारेजमध्यें ठेवण्यांत आले होते ही गोष्ट खरी आहे पण ते डबे तेथून हलविण्याचें मुख्य कारण म्हणजे घरमालक केरवाला यानें ते ज्वालाग्राही पदार्थांचे डबे इथून हलवा अशी दिलेली सूचना. कुलदीप आतां येत नाहीं असें पाहून अमरिकसिंगानें ते डबे तेथून हलविण्याचा निश्चय केला. त्याप्रमाणें अमरिकसिंगानें नूरमहंमदची गांठ घेतली. नूरमहंमद हा कुलदीपचा भागीदार अशी त्याची समजूत होती. आपण कुलदीपचा आपल्या दिवाणखान्यांत खून केला अगर बांद्रावाल्याकडे जाऊन २० रु. उसने घेतले, त्याची ट्रंक विकत घेतली, कोंडाजीकडून ती ट्रंक हलविली अगर रामशरणला त्या ट्रंकेसह गार्डींत बसविलें या सर्व आरोपांचा त्यानें इन्कार केला. नूरमहंमदला आपण नारायण एक्स्पोर्ट इंपोर्ट कंपनीच्या नांवाची लेटर हेड्स् छापायच्या सूचना दिल्या, आणि त्या मालाची रक्कम आपण आपल्या ताब्यांत घेतली हेंहि त्यानें पूर्ण नाकबूल केलें. ( या संदर्भात नूरमहंमदाची उलट तपासणी अगदींच भोंगळ झाली. कोणत्याहि प्रश्नाचीं त्याला सुसंगत उत्तरें देतां आलीं नाहींं.)

किशन या नोकरानें या प्रकरणांत आपल्याला कांहींच माहिती नाहीं असें सांगितलें.

रामशरणच्या म्हणण्याप्रमाणें तो दिल्लीला २४ सप्टेंबर १९४७ ला गेला. आपण कुलदीपबाबत कोणतीच तार मुंबईला पाठविली नाहीं असें त्यानें शपथेवर सांगितलें. रिस्टवॉचबाबत विचारतां तो म्हणाला तें त्याचे स्वतःचेंच घड्याळ होतें आणि त्यामुळें त्यानें तें बेधडक बाळकृष्णनूला विकलें. मॅजिस्ट्रेट पुढील जबानीबाबत त्याला विचारलें असतां तो म्हणाला कीं त्याला २३ सप्टेंबरला अटक करण्यांत आली आणि २५ सप्टेंबरपर्यंत पोलीस कोठडींत ठेवण्यांत आलें. आणि पोलिसांनीं पढविल्याप्रमाणें त्यांना हवा तसा जबाब दिला.

रामशरणच्या जबानी प्रमाणें, कुलदीपला पिस्तुलाच्या साहाय्यानें मारण्यांत आलें. पण कुलदीपचें प्रेत जेव्हां शामगढच्या डॉक्टरनीं तपासलें तेव्हां मयताच्या गळ्यावर १० इंच लांब दोन इंच रुंद आणि तीन इंच खोल अशी सुऱ्यानें केलेली जखम आढळली. आणि याच जखमेमुळें कुलदीपला मृत्यु आला असा अभिप्राय डॉक्टरनें दिला होता. या बाबत फिर्यादीपक्षातर्फे असें सांगण्यांत आलें कीं कुलदीपवर प्रथम पिस्तुल जरी चालविण्यांत आलें तरी त्यामुळें त्याला मृत्यु आला नाहीं. त्यामुळें गुन्हेगारांनीं त्याला सुऱ्याच्या साहाय्यानें ठार मारण्याचा प्रयत्न केला. पण कुलदीपच्या मानेवर झालेल्या जखमेवरून मेडिकल ऑफीसरला असें कांहीं सिद्ध करतां आलें नाहीं कीं कुलदीपचा मृत्यु पिस्तुलाच्या गोळीमुळें झाला. त्याचें म्हणणें असें कीं ज्यावेळीं त्यानें मयताची तपासणीं केली त्यावेळीं मानेवरच्या सुरीच्या जखमेमुळें त्याच्या डोक्यांत पिस्तुलाची कल्पनाहि आली नाहीं. पिस्तुलाच्या गोळीनें झालेली जखम सुऱ्याची जखम करून या ठिकाणीं पूर्वी पिस्तुलाची गोळी घुसली होती कीं नव्हती अशी परिस्थिति निर्माण करणें शक्य आहे.

हा खून एका दिवाणखान्यांत घडला असें फिर्यादीपक्षाचें म्हणणें. दोन खोल्यांच्या मधली एक खोली दोन्ही बाजूचे बिऱ्हाडकरू समाईक म्हणुन वापरीत. दुसरा बिऱ्हाडकरू म्हणजे बांद्रावाला. त्या दिवशीं रात्रौ नऊ बाजेपर्यंत बांद्रावाला कामावरून परत आला नव्हता हें खरें असलें तरी नेहमींप्रमाणें त्या दिवशींहि त्याचा नोकर झाडलोट करायला संध्याकाळीं ६ वाजेपर्यंत आला असला पाहिजे. अशा परिस्थितींत संध्याकाळीं ५॥ वाजतां खोलींत खून करून त्याची नांवनिशाणीहि नाहींशी करणें कसें शक्य आहे. याशिवाय अमरिकसिंगाच्या बिऱ्हाडाशेजारीं मिसेस मिलर नांवाची एक बाई राहात असे. अमरिकसिंगानें आपल्या कुटुंबियांना त्यादिवशीं बाहेर पाठवलं अशी रामशरणची जबानी, पण त्याला कोणताच दुजोरा मिळाला नाहीं. हा खून सुऱ्याचा वार करून झाला असें फिर्यादी पक्षाचें म्हणणें मान्य केलें तर खोलींत बरेचसें रक्त सांडण्याचा संभव आहे. अशा परिस्थितींत बांद्रावाल्याला आपल्या खोलींत कुठें रक्त सांडल्याचा संशय आला होता असें सिद्ध करणारा पुरावा पुढें आला नव्हता.

बांद्रावाल्याचें असें म्हणणें कीं आपण अमरिकसिंगाला वीस रुपये उसने दिले. पण त्यादिवशींचा बँक अकाऊंट तपासल्यावर असें आढळले कीं अमरिकसिंगानें त्यादिवशीं बँकेंत एकूण ९४ रु. भरले. हे पैसे दुपारीं ३ च्या आंत भरले गेले. यावरून असें सिद्ध होतें कीं तीन वाजेपर्यंत तरी आपल्याला एक खून करून तें प्रेत ट्रंकेंत ठेवावयाचें आहे याची त्याच्या मनाशीं कल्पनाहि नव्हती. अशा प्रकारचा खून कोणीहि माणूस पूर्वतयारी शिवाय करणें कितपत संभवनीय आहे ?

अमरिकसिंगानें १०००० रु. किंमतीच्या राळेच्या डब्यासाठीं हा खून केला अशी बाजू फिर्यादी पक्षातर्फे मांडण्यांत आली. याबाबत आरोपीचें म्हणणें असें कीं आपण दाणाबंदरला माल हलवला आणि लॉरीचें भाडें दिलें पण त्यानंतर आपण पैशाच्या व्यवहारांत पडलों, अगर पैसे घेतले याबाबत त्यानें पूर्ण इन्कार केला.

फिर्यादी पक्षातर्फे मांडण्यांत आलेला आणखी एक पुरावा म्हणजे आरोपीच्या कचेरींत सांपडलेलें पिस्तुल. हें पिस्तुल एका उघड्या कपाटांतील खालच्या खणांत वर्तमानपत्राखालीं ठेवलेलें सांपडलें. अमरिकसिंगाचें असें म्हणणें

( पान ३४ वर )




माणसाला आयुष्यांत अनेक प्रश्न पडतात. आणि ते प्रश्न कुणाला विचारावेत असाहि त्याला प्रश्न पडतो. आपण आपले प्रश्न (प्रतिमहिन्याच्या दहा दिनांकापर्यंत) आम्हाला विचारा व त्याची खेळीमेळीनें दिलेली उत्तरें तितक्याच खेळीमेळीनें ऐकायची सिद्धता ठेवा. येथें घातलेली ही पाणपोई आहे. गंडाचे गुत्तक नव्हे. हें सर्व व्रस्त तृषितांच्या ध्यानांत येईलच ! दर महिन्याच्या सर्वोत्कृष्ट प्रश्न विचारणाऱ्या मार्मिक वाचकाला आम्ही पांच रुपयांचें पारितोषिक देणार आहोंत. ह्या महिन्यांतील सर्वोत्तम प्रश्नाबद्दल कु. कुसुम गुप्ते, दादर यांना पांच रुपयाचें पारितोषिक देण्याचें ठरलें आहे. त्यांना मनीऑर्डरीनें पैसे पाठविले जातील.

**श्री. दिनकर टिपणीस**, सातारा.

**प्रश्न १ ला**—गोव्याबाबतचें भारत सरकारचें धोरण आपणाला कितपत मान्य आहे ? हा प्रश्न लौकर निकालांत निघण्यासाठीं भारत सरकारनें कोणती भूमिका घ्यावी ?

**उत्तर**—दारुबंदीचें धोरण तात्काळ बंद करावें. उत्कृष्ट "दारू" हेच पोर्तुगीजांचें खरें सामर्थ्य आहे. दारूला उत्तर दारूनेच दिलें पाहिजे.

**प्रश्न २ रा**—विद्यार्थ्यांच्या बेशिस्तीला प्रमुख कारण म्हणजे नालायक प्राध्यापक या आक्षेपावर आपलें काय म्हणणें आहे ?

**उत्तर**—प्राध्यापकांच्या नालायकीला विद्यार्थी कारणीभूत आहेत. विद्यार्थ्यांच्या नालायकीला त्यांचे प्राध्यापक कारणीभूत आहेत.

—मुले नालायक निघतात कारण त्यांचे आईबाप नालायक असतात.

—आईबाप नालायक ठरतात कारण त्यांची मुले नालायक निघतात.

—नेते नालायक ठरतात कारण समाज नालायक आहे.

—आणि समाज नालायक आहे कारण तो नेमके नालायक नेतेच निवडतो.

—नालायकांना नेहमीं नालायकच भेटतात.

—नालायकांना नेहमीं नालायकच आवडतात.

—नालायक नालायकांना उत्पन्न करूं शकतो.

—व त्यांना नालायकीचे धडे देऊं शकतो.

एक नालायक शंका विचारतो.

व दुसरा नालायक त्याचें समाधान करतो.

—असा हा सगळा नालायकांचा बाजार आहे ! येथें कुणी कुणाला बोल लावावा ?



**कु. रजनी पाटील**, मुंबई.

**प्रश्न ३ रा**—संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न सनदशीर आणि शांततापूर्ण मार्गानें कसा सुटेल ?

**उत्तर**—ज्या कुठल्या मार्गानें संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न सुटेल, तो सनदशीर आणि शांततापूर्णच ठरेल. खोटें वाटत असेल तर मोरारजीभाईंना विचारा !

**प्रश्न ४ था**—आपण सिनेमा पहातां काय ? "सिनेमाचा तरुणतरुणींवर अनिष्ट परिणाम होतो." या विधानावर आपलें काय मत आहे ?

**उत्तर**—सिनेमाचा तरुणतरुणींवर अनिष्ट परिणाम होत नाहीं उलट सिनेमावरच तरुणतरुणींचा अनिष्ट परिणाम होतो. म्हणून मी सिनेमा पहाण्याऐवजीं तरुणतरुणींकडेच पहात बसतो !

**सौ. सुलभा गायकवाड**, बडोदें.

**प्रश्न ५ वा**—दारुबंदी आणि ग्रामोद्योग यांचा परस्पर संबंध काय ?

**उत्तर**—फार जवळचा संबंध आहे. दारुबंदीमुळें खेड्यापाड्यांतून एक फार मोठा हस्त व्यवसाय उभा झाला आहे. सहस्रावधी माणसें ह्या गांवठी उद्योगांत मग्न आहेत. ज्यांना काम नव्हतें त्यांना भरपूर काम मिळतें आहे. ज्यांचेपाशीं छदाम नव्हता त्यांना भरपूर दाम मिळत आहेत. पावसापाण्याविना वा शेतीभातीविना हीं भाग्यवान माणसें सोन्याचें पीक काढत आहेत. ह्या ग्रामोद्योगी माणसांना अन्य कांहीं करावयास मुळींच सवड नाहीं. बायकापोरेंही त्यांना त्यांच्या उद्योगांत यथाशक्ति हातभार लावीत असतात. "आराम हराम है" हेंच त्या साऱ्यांचें ब्रीदवाक्य आहे. अडलेल्यांची अडचण दूर करण्यासाठींच ही सारी परोपकारी माणसें झटत आहेत. ह्या पारमार्थिक कार्यासाठीं पडेल तो "दंड" झेलावयासहि ही माणसें सिद्ध असतात ! आपल्या ग्रामोद्योगी ध्येयासाठीं वेळप्रसंगीं तुरुंगांत जावयासहि त्यांची ना नाहीं; अशी त्यांची निष्ठा जाज्वल्य आहे. स्वार्थ आणि परमार्थ ह्यांचा ह्या नव्या ग्रामोद्योगांत अपूर्व संगम झालेला आढळतो आणि ह्या लोकप्रिय ग्रामोद्योगाचा प्राण आहे "दारुबंदी" कारण दारुबंदी म्हणजेच "दारु बनती !" (इति मित्रवर्य **दाभोळकर**)

**प्रश्न ६ वा**—नवकाव्य जाळून टाकलें तर "ॲस्प्रोचा" खप कमी होईल हें विधान सत्याला कितपत धरून आहे ?

**उत्तर**—ॲस्प्रोचा खप कमी होईल आणि कोकशास्त्रीय पुस्तकांचा खप वाढेल.

**कुमार अशोक वाघ**, गिरगांव

**प्रश्न ७ वा**—आपल्याला भारताचे पंतप्रधान केले तर आपण पहिली गोष्ट कोणती कराल ?

**उत्तर**— स्वतःच्या तोंडावर एक भले मोठे कुलूप लावून घेईन.

श्री. **वा. वा. अमृते** साहित्यप्रास, पापडी–वसई.

**प्रश्न ८ वा**— मातृत्व हें स्त्रियांच्या यशस्वी जीवनाचें गमक समजावें काय ?

**उत्तर**— नाहीं. तें पुरुषांच्या यशस्वी जीवनाचें गमक आहे.

**प्रश्न ९ वा**— **न. र. फाटक** आणि वि. **मा. दि. पटवर्धन** यांनी कोणते साहित्य प्रसवले ?

**उत्तर** - वाचता वाचता हसावें असें गंभीर साहित्य श्री. फाटक प्रसवले व हसतां हसतां रडावें असें विनोदी साहित्य श्री. पटवर्धनांनी निर्माण केलें.

श्री. **धोंडिबा सोनटक्के**–सिन्नर.

**प्रश्न १० वा**—" बायका मूर्ख असतात " या विधानावर आपलें प्रामाणिक मत काय ?

**उत्तर**—बायकांविषयीं प्रामाणिक मत देण्याइतका मी मूर्ख नाहीं. पण बायका मूर्ख असतात असें गृहित धरलें तरी ह्या मूर्ख बायकांकडून जन्मभर मूर्ख बनणाऱ्या पुरुषांना काय म्हणावें !

श्री. **गोविंद परुळेकर**–शीव.

**प्रश्न ११ वा**—संसारसुखाच्या कल्पना काय ?

**उत्तर**—संसार सुख ही केवळ एक कल्पना आहे.

**कु. ललिता देशमूख.**

**प्रश्न १२ वा**—" बौद्धिक प्रेम " ही काय भानगड आहे ? याचा आपणाला कधीं प्रत्यय आला आहे का ?

**उत्तर**—बुद्धिवान माणसांनी आपल्या भानगडीवर घातलेले निर्बुद्ध पांघरूण म्हणजे " बौद्धिक प्रेम. " ज्या वयांत ह्या प्रेमाचा प्रत्यय येतो त्या वयांत अद्याप मी आलों नाहीं.

श्री. **आ. सो. वनमाळी**, माणिकपूर–वसई.

**प्रश्न १३ वा**—' रामायण ' ' महाभारत ' ह्या काव्यांतील नायकांच्या–राम-कृष्ण यांच्या मूर्ति–देवालये पहावयास मिळतात पण ' स्वप्न वासवदत्तम् ' ' शाकुंतल ' वगैरे काव्यांतील नायक नायिकांची देवालयें कां नाहींत ?

**उत्तर**—आहेत त्या देवळांतून कित्येक वेवारशी प्राण्यांची उत्तम सोय होत आहे. त्यांना जागेची टंचाई भासूं लागली म्हणजे आपण म्हणतां तशी नवी देवळें बांधली जातील.

**श्री. के. आर. देशपांडे,** नागपूर

**प्रश्न १४ वा**—एखाद्या मोठ्या पुढाऱ्याला " राष्ट्रपिता " म्हणून संबोधणें बरोबर आहे काय ?

**उत्तर**—नाहीं. कितीही मोठा पुढारी झाला तरी तो अखेर भारतमातेचा पुत्र आहे. " पति " अथवा " पिता " नव्हे !

**कुसुम गुप्ते**, दादर

**प्रश्न १५ वा**—स्त्रीची सगळ्यांत मोठी शक्ति कोणती ?

**उत्तर**—तिची अशक्तता.

**पु. भा. भावे**

[ पान ३२ वरून ]

कीं पिस्तुल ज्या ठिकाणीं सांपडलें त्या ठिकाणाहून तें कुणालाहि उचलतां येईल अशी परिस्थिती होती. त्यामुळें तें पिस्तुल मीच नेलें हें कशावरून ?

आतां ज्यूरीपुढें निर्णयार्थ प्रश्न असा कीं रामशरणनेंच खून केला कीं काय आणि केला असल्यास त्याला अमरिकसिंगानें याकामीं उत्तेजन दिलें कीं नाहीं ज्यूरींनी अमरिकसिंग एकमतानें ' दोषी ' असा निर्णय दिला आणि रामशरणहि दोषी असा निर्णय ८ विरुद्ध एक मतानी देण्यांत आला.

आरोपीतर्फे हायकोर्टांत अपील करण्यांत आलें. त्यावेळीं न्यायमूर्ति राजाध्यक्ष आणि न्यायमूर्ति चैनानी होते. परिस्थितिजन्य पुरावा हा विश्वसनीय मानतां येणार नाहीं. हें म्हणणें कोर्टानें मान्य केलें. ज्या मॅजिस्ट्रेटसमोर ही जबानी घेण्यांत आली त्याला जबानी नोंदवण्याचा अधिकार नव्हता. कोर्टानें आरोपीला संशयाचा फायदा देऊन निर्दोषी म्हणून सोडलें.

आणि कुलदीपच्या मृत्यूचें गूढ न्यायालयांत तरी अज्ञातच राहिलें.



## राधेची त्रेधा ?

तो सदाच कान्हा तिजवर याचा डोळा
अन् तिळाहि रुचतो असा वाकडा चाळा
चोरून पाहते चुकचुकि सखिच्या नजरा
हा लपंडाव खेळते सदा सुखसारा
ही सवय लागता चोरुनिया बघण्याची
ती राजरोस वाकडी नजर कृष्णाची
नजरेच्या घडती अशा वाकड्या भेटी
हळुहळु जाहली तिचिही तिरळी दृष्टी
आधीच प्रीतिची जडली मोहनबाधा
तें ध्यान पाहता झाली तिरळी राधा
बघतांना इकडे वाटे बघते तिकडे
अन् सरळ पाहतां वाकडेच तिरपगडे
सुटणार कशी ती सवयीची हकूबाधा
राधेची उडते बघता बघता त्रेधा

— राजा बढे

पुस्तकांची चांगली परीक्षणें लोक करीत नाहींत आणि वाचीतहि नाहींत. मराठीचें साहित्यशास्त्र बऱ्याच अंशीं उत्तम पुस्तकपरीक्षणांमुळेंच परिणत झालें. त्यामुळें स्फूर्तिची फुलें या सदरांत चोखंदळ रसिकांकडून निवडक पुस्तकांचीं परीक्षणें सादर करण्याचा आमचा विचार आहे. याकरितां प्रकाशकांनीं आपल्या पुस्तकाच्या किमान दोन प्रती आमच्याकडे पाठविणें आवश्यक आहे.



# परमेश्वर आणि मी

- एस्. एम्. जोशी
- शं. वा. किर्लोस्कर
- विभावरी शिरूरकर
- जहांगिर-हाथीराम

हजारों वर्षें मानवानें जंग जंग पछाडले. पण या सृष्टीच्या सर्वशक्तिमान नियंत्याच्या अस्तित्वाचें गूढ अजून तरी त्याला उकललेलें नाहीं. थोर भक्तजनांना साक्षात्कार झाल्याचें दाखले आहेत आणि सर्वसामान्यांच्या जीवनांत कधीं कधीं अतर्क्य अशा घटना घडून येतात आणि हें गूढ अधिकच गहन होतें. दीपावलीतर्फे महाराष्ट्रांतील विविध क्षेत्रांत अग्रभागीं चमकणाऱ्या कर्तृत्ववान व्यक्तींपासून तों समाजाच्या खालच्या थरांतील व्यक्तींना या विषयाबाबत एक प्रश्नपत्रिका पाठविण्यांत आली. ही प्रश्नपत्रिका पुढें दिलीच आहे. या उपक्रमाला सर्वांनीं मोठें आपुलकीचें सहकार्य दिलें. या उत्तरपत्रिकांतील निवडक अशा कांहीं पत्रिका दरमहिन्यास आम्हीं वाचकांना सादर करणार आहोत.

## — आमची प्रश्नपत्रिका —

**१—आपला परमेश्वरावर विश्वास आहे कां? असेल तर कां? नसेल तर कां नाहीं?**

**२—आपला धर्मावर विश्वास आहे का? असेल वा नसेल! तर काय म्हणून?**

**३—आपण प्रतिदिनीं पूजा वा प्रार्थना ह्यापैकीं कांहीं नियमितपणें करतां काय? आपण एखाद्या धार्मिक पुस्तकाचें वाचन करतां काय?**

**४—आपणांस दैवी अथवा अतिमानवी, म्हणजे ज्याचें स्पष्टीकरण सर्वसामान्य तर्कान्वयें देतां येत नाहीं, असा कांहीं अनुभव आलेला आहे काय?**

**५—वरील प्रश्नांशिवाय मानव आणि परमेश्वर यांच्या परस्पर संबंधासंबंधी आणखी कांहीं सांगूं शकाल का?**

## एस्. एम्. जोशी

मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र म्हणजेच एस्. एम्. जोशी असे हें समीकरण गेल्या दोन वर्षांत ज्यांच्या नांवाने रूढ झाले असे प्रजासमाजवादी प्रमुख महाराष्ट्रीय कार्यकर्ते.

**उ. १**—परमेश्वर या शब्दाची व्याख्या आपण काय करतो त्यावर या प्रश्नाचें उत्तर अवलंबून आहे. प्रत्येक व्यक्तीच्या अन्तःकरणांत चांगलें काय आणि वाईट काय याची निवड करण्याबाबत उत्कंठा असते असा माझा विश्वास आहे. यालाच सत्यासत्यविवेक असें म्हणतां येईल. मानवानें आपली ही सत्यान्वेषणाची धडपड न डगमगतां, अविरतपणें चालू ठेविली तर बऱ्या-वाईटाची कसोटी करण्याचा निकष एकच असल्याचें त्याच्या प्रत्ययास येते. तो निकष म्हणजे मानवाला मानवासंबंधीं वाटणारें प्रेम आणि त्यामुळें होणारा अतुलनीय आनंद. यांतूनच सर्व मानवाशीं आणि शेवटीं सर्व विश्वाशीं एकरूप होण्याची तीव्र आकांक्षा निर्माण होईल आणि एक विशिष्ट आनंदमय जीवन जगतां येईल. अशी माझी श्रध्दा आहे. या अर्थानें ईश्वराचा अर्थ लावल्यास मी आस्तिक आहे.

**उ. २**—हिंदू समाजांत मनुष्य जसा कोणत्या तरी एका जातींत जन्माला येतो आणि म्हणून त्याला ब्राह्मण, क्षत्रिय, मराठा, माळी अशी नांवें दिलीं जातात. त्याचप्रमाणें दरेक मनुष्य या सुधारलेल्या जगांत एका विशिष्ट धर्मांत जन्माला येतो; परंतु तो ज्यावेळीं धर्मासंबंधीं आणि कर्तव्यासंबंधीं गंभीरपणें विचार करूं लागतो त्यावेळीं त्याला असें दिसून येतें कीं सर्व धर्मांचें तत्त्व जवळपास एकच आहे. फरक काय तो संघटनेच्या आणि मार्गांच्या दृष्टीनें पडत असतो. ज्याला एकवेळ ही गोष्ट समजून येते कीं प्रत्येक धर्मांतील तत्त्व समान आहे, तो संघटनेबाबत वादविवाद न करतां सर्व धर्मांबाबत समभावना ठेवण्याचा प्रयत्न करतो. यादृष्टीनें पाहिल्यास धर्मावर माझा विश्वास नाहीं असा अट्टाहास करणें मला निरर्थक वाटतें.

**उ. ३**—नाहीं.

प्रतिदिनीं वाचन करीत नाहीं. परंतु अधूनमधून गीतारहस्य, विनोबांचे लेख आणि क्वचित् प्रसंगीं ज्ञानेश्वरींतील कांहीं ओव्या वाचतो.

—**उ. ४**—असा अनुभव आयुष्यांत एकदांच आलेला आहे. परंतु तो आज सांगतां येत नाहीं. पुढें कधीं प्रसंग आल्यास सांगेन.

• •

अनुक्रमणिका

## शं. वा. किर्लोस्कर

'किर्लोस्कर' मासिक आणि शं. वा. कि. या दोन अभिन्न वस्तु आहेत. आपल्या कुशल आणि धडाडीच्या संपादकीय धोरणानें किर्लोस्करनें मराठी वाङ्मयांत आणि मराठी आचारविचारांत फार मोलाची भर घातली. शं. वा. कि. यांचा मित्रपरिवार म्हणजे एक छोटेसें प्रतिनिधिक महाराष्ट्र संमेलनच. त्यांची आतां सार्वजनिक कार्यातून निवृत्ति.

**प्रश्न १ :** या प्रश्नाचें योग्य उत्तर द्यावयाचे तर अगोदर त्याचा निश्चित अर्थ समजला पाहिजे. तसा तो समजत नाहीं, याचें कारण या प्रश्नामध्यें वापरलेल्या 'परमेश्वर' व 'विश्वास' या शब्दांना मुळांतच निश्चित अर्थ नाहीं. पुष्कळ शब्दांचे अर्थ अतिशय भोंगळ व व्यापक असतात. त्यांपैकींच हे शब्द आहेत.



परमेश्वराची व्याख्या आपण काय करतां ? या चराचर विश्वांत व्यापून राहिलेली शक्ती एवढाच या शब्दाचा आशय आपण समजत असाल तर तो मला मान्य आहे.

परंतु एकाद्या सार्वभौम बादशहाप्रमाणें स्वर्गात बसून राज्य करणारा तो सत्ताधारी पुरुष आहे, वेषांतर करून हिंडणाऱ्या खलीपाप्रमाणें तो मधूनमधून अवतार धारण करून पृथ्वीवर आगमन करतो, तो परमन्यायी व दयाळू आहे तसाच खुशामतीने प्रसन्न होणारा प्राणी आहे, त्याच्यापुढें नैवेद्य ठेवून, लोटांगण घालून अथवा त्याला नवस करून त्याची मर्जी संपादन करतां येते अशी परमेश्वराबद्दलची कल्पना असेल, तर ती मला मान्य नाहीं. माझा परमेश्वरावर विश्वास आहे याचा अर्थ त्या विश्वव्यापी शक्तीचें अस्तित्व मी नाकारत नाहीं.

परंतु त्याचा धांवा केला असतां तो माझें संकट निवारण करील, अथवा त्याच्या नांवाचा जप केला असतां तो आपल्याला एकादें बक्षीस अथवा देणगी देईल, अशा प्रकारचा माझा त्यावर विश्वास नाहीं. सृष्टींत पसरलेली चैतन्यशक्ती आपल्याला प्रत्यक्ष दिसते म्हणून तिच्यावर माझा विश्वास आहे. दुसऱ्या प्रकारचा परमेश्वर मात्र कुठें आढळत नाहीं म्हणून मी त्यावर विश्वास ठेवूं शकत नाहीं.

**प्रश्न २ :** पुनः तीच अडचण. धर्माची निश्चित व्याख्या काय ? चातुर्मासांत कांदे खाणें म्हणजे अधर्म तर काशीयात्रा करणें म्हणजे धर्म. तसेंच विधवेनें पुनर्विवाह करणें म्हणजे अधर्म आणि महारांना अस्पृश्य मानणें म्हणजे धर्म असल्या पोथीप्रणीत कल्पना शिरसावंद्य करणें म्हणजे धर्मपालन असे मानायचें कां ? धर्माचे तत्व एक मोठे गूढ आहे असें यावरून दिसून येते. एवढ्यासाठीं धर्माविषयीं कुणी अधिक चिकित्सा न करतां "महाजनो येन गतः स पंथाः" हा मार्ग पत्करावा असें सांगण्यांत येते. पण हा आंधळेपणाने वागण्याचा उपदेश मला अयोग्य वाटत असल्याने अंधश्रद्धेवर आधारलेल्या कुठल्याच धर्मावर माझा विश्वास नाहीं. आतां चिकित्सक व समाजशास्त्राच्या दृष्टीनें आपल्या सर्व चालीरीतींकडे पहाण्याचा काळ आला आहे. तेव्हां यापुढें जी नवीन समाजरचना स्थापन करण्याची आवश्यकता भासत आहे, तिला पोषक होणारा वास्तववादी आणि सुगम नवा धर्म अस्तित्वात यायला पाहिजे. तूर्त आपल्या सारासार विचारशक्तीला व सदसद्विवेक बुद्धीला स्मरून वागणें हाच प्रत्येकाला आचारावयास योग्य असा धर्म आहे. त्यावर माझा विश्वास आहे. अन्याय, जुलूम अथवा विषमता यांची तळी उचलून धरणाऱ्या कुठल्या धर्मावर यापुढें जनतेचा विश्वास राहील ?

**प्रश्न ३ :** मी दासबोध अधूनमधून वाचतो.

**प्रश्न ४ :** मला असला एकही अनुभव आलेला नाहीं. प्रत्येक घटनेमागें कांहीं ना कांहीं कार्यकारण भाव असतो. तो आपल्या लक्षांत येऊं शकला नाहीं म्हणजे तो दैवी चमत्कार ठरत नाहीं.

**प्रश्न ५ :** चांगल्या कार्यात सदैव मग्न असणें व सर्वांशी सद्भावनेनें वागणें हीच माझ्या मतें ईश्वराची खरी पूजा अथवा प्रार्थना आहे. आकाशातल्या कल्पित परमेश्वराचा आपला कधीं संबंध येत नाहीं. तथापि आपल्या भोवतालच्या प्राणीमात्रांच्या अंतस्थ परमेश्वराशी आपला नित्य संबंध येत असतो. एवढ्यासाठीं त्या सर्वांनी आपल्याशीं जसं प्रेमानें व सौजन्यानें वागावें असें आपल्यास वाटते तसेंच त्या सर्वांशी आपण वागणें हाच परमेश्वराजवळ जाण्याचा सोपा मार्ग आहे असें मला वाटते.

● ●

## विभावरी शिरूरकर

कळ्यांचे निश्वास आणि हिंदोळ्यावर या आपल्या पुस्तकांमुळें हें नांव महाराष्ट्रांत एकेकाळीं फारच गाजलें. अजूनहि ती कीर्ति कायम आजहि लेखनाची हौस तितकीच जोरदार.

एकदां माझी आई मृत्यूच्या दारीं उभी होती. आम्ही लहान लहान आठ भावंडें. 'आई' हेंच सर्वस्व. जाणतीं मुलें आईला देवानें वाचवावें म्हणून परमेश्वराची आळवणी करीत होतीं. मीही देवाच्या दारीं मनानें धरणें धरलें, आणि अक्षरशः मृत्यूच्या दाढेंतून आमच्या प्रार्थनेनें आई जगली असें मला वाटलें.

असाच एक दुसरा प्रसंग. एकदां माझे वडिल भयंकर कमरदुखीनें दीडदोन महिने बिछान्याला खिळले होते. त्यांना कुशीवरहि वळतां येत नव्हतें. बसण्याची आणि उभे राहाण्याची तर शक्यताच नव्हती. अशा स्थितींत अमवास्येला माझे वडील रात्रीं अकरा साडेअकराला जागे होऊन म्हणाले, "......पायीं मला पर्वतीला घेऊन चला."

माझी आई आणि आम्ही दोघी बहिणी हतबुद्धच झालों. ह्या वेळेला अण्णांना पर्वतीला न्यायचें कसें ? पुण्यांत तर पर्वतीच्या रस्त्यानें दिवेहि नव्हते. रात्रीची वेळ. अण्णा म्हणाले, " मला पर्वतीला न्या म्हणजे बरा होशील असें सांगितलें आहे, तेव्हां आपण जायचंच."

अण्णांना तर बसतांही येत नव्हतें. पण हा दृष्टांत असावा असें आम्हां सर्वांना वाटलें. त्यामुळें तें डावलताही येणें अशक्य होतें. आम्ही कंदील लावले. अण्णांना कसेंबसें बसतें केलें. उभे धरण्याचा प्रयत्न केला. बसणें, उभें राहणें यामुळें भयंकर वेदना होत होत्या. घराच्या पायऱ्या उतरवून अत्यंत कष्टानें आम्ही त्यांना रस्त्यावर आणलें. अशा रीतीनें पर्वतीला जाणार कशा ? आम्हीं हतबुद्ध झालों होतों. पांच मिनिटें मोठ्या कष्टानें अण्णा एकेक पाऊल कण्हत कण्हत मोठ्या

अनुक्रमणिका







कष्टानें टाकत होते. आणि मग सर्वस्वी आमच्यावर भार न टाकतां ते स्वतःला सावरीत असल्याची आम्हांला जाणीव होऊं लागली. अर्ध्या तासांतच अण्णांना आम्ही केवळ नाममात्र आधार देऊं लागलों. अखेरीस भ्यालेल्या मनानें निःशब्दपणें आम्ही तिघी अण्णांना घेऊन पर्वतीच्या साऱ्या पायऱ्या चढून जाऊन देवीला बाहेरूनच नमस्कार करून पुन्हा पायऱ्या उतरून खालीं आलों आणि पायीं घरीं आलों. या साऱ्या घटनेला शास्त्रीय उत्तर असेलही. पण अजूनहि माझें मन शास्त्रीय उत्तरापेक्षां परमेश्वरावरच अवलंबून उत्तर देतें.

लहानपणीं माझ्या मनानें देवळांतील देवांची भक्तिपूर्वक पूजा केली. बालबुद्धीनें कां होईना पण कर्मकांड आचरण्याची कसोशी केली. माझें मन त्यावेळीं अति श्रद्धाळू होतें. पण पुढें पुढें या सर्वांवरचा विश्वास उडाला. देव देव्हाऱ्यांतच नि देवळांतच असतो आणि तो असल्या कर्मकांडाने प्रसन्न होतो हें मला मुळींच पटेना. परमेश्वरावर माझा विश्वास आहे कीं नाहीं याचा त्यावेळीं मनांत विचार आला तरी असल्या दंडेलीनें परमेश्वरावर माझा विश्वास नाहीं असें म्हणण्यांत मला आनंद होई— नव्हे भूषण वाटे. पण आश्चर्य असें कीं कुणाबरोबर देवळांत गेलें तर नकळत माझे हात जुळत. भव्य निसर्ग पाहून माझें मन परमेश्वराच्या करणीचें कौतुक करी. देव नाहीं असें म्हणण्यांत आनद मानणारें माझें मन देवावर विश्वास ठेवून होतें.

परमेश्वर म्हणजे काय हें मला कळत नाहीं. सांगता येत नाहीं. पण अशा न कळणाऱ्या, न सांगता येणाऱ्या परमेश्वरावर माझा विश्वास आहे. विज्ञानयुगांत हें हास्यास्पद दिसतें पण ही वस्तुस्थिति आहे खरी. मी पूजा करीत नाहीं व्रतवैकल्यें करीत नाहीं, पोथी किंवा धार्मिक ग्रंथाचें नित्य रोज वाचन करीत नाहीं. आचारकांड कोणतेंच पाळीत नाहीं. पण मला रात्रीं निजण्यापूर्वीं परमेश्वराचें स्मरण करून निजण्यांत आनंद आणि समाधान वाटतें तें कां हेहि मला सांगतां येत नाहीं. तरीहि मनानें असें घडतें याबद्दल माझें मन दबकतहि नाहीं अगर शरमतहि नाहीं.

माझा कांहींच अपराध नसतांना आपत्तींनीं पार खचून गेलेल्या माझ्या मनानें अनेक वेळां देव आहे कीं नाहीं असा प्रश्न स्वतःशीच विचारला आहे आणि त्याची निर्भत्सना करूनहि पुन्हा तोच तारील म्हणून सर्वस्वीपणें त्याचाच आधार घेतला आहे.

हिमालयाच्या कुशीवर वागडतांना माझें अणुरेणू एवढेंहि अस्तित्व नाहीं याची जाणीव मला सतत होत होती, तसें त्या महान् पवित्र आणि भव्योदात्त निसर्गातच परमेश्वराचें अस्तित्व पदोपदीं जाणवत होतें. देवळांतील देवाच्या दर्शनानें रुक्ष राहणारें माझें मन केदारनाथचें दर्शन होतांच इतकें हळूवार झालें कीं अर्धातास माझ्या डोळ्यांना धारा लागल्या. याचें माझें मलाच आश्चर्य वाटतें. मानव आणि परमेश्वर यांच्या परस्पर संबंधाविषयीं मला कांहींच सांगतां येणार नाहीं परंतु परमेश्वराला मानवी देहासारख्या रूपांत पाहाणें मला मुळींच आवडत नाहीं. भव्य निसर्गाच्या सानिध्यांत स्वतःच्या अणुरेणुत्वाची जाणीव तीव्र होऊन निसर्गाबद्दल जी परमपवित्र आणि उदात्त भावना निर्माण होते तीच भावना परमेश्वराबद्दलची असते. मानवानिर्मित जगाच्या कोलाहलांत माणूस इतका महत्त्व पावतो कीं त्याची सत्त्वाची जाणीव पुरी मावळते, अहंता वाढते रजतमांत तो बुडून जातो.

अनेक देशाच्या पुढाऱ्यांना चार सहा महिने एकाकी भव्य निसर्गाच्या सानिध्यांत ठेवल्यास त्यांच्या विचारांची धाटणी बदलेल असें मला आजवर अनेकवेळां वाटत असे. जेवढा मानवनिर्मित कोलाहलांत माणूस अधिक सांपडलेला असतो तितकाच तो विनाशी वृत्तीच्या आहारीं सांपडतो. वितंडवादी लढाऊ वृत्तींना पोसतो. त्या कोलाहलांतून पुढाऱ्यांना भव्य निसर्गाच्या मांडीवर कांहीं दिवस सोडल्यास जगाची धाटणी निराळी होईल असें वाटतें.

## जहांगीर हाथीराम

वय वर्षे ४८. धर्मानें पारशी पण वृत्तीनें मराठी माणूस. बालपण आणि शिक्षण सातारा येथें. घरच्या श्रीमंतीमुळें निम्म्याहून अधिक आयुष्य ख्यालीखुशालींत गेले. आज मध्यरेल्वेवर मुंबई पुणें-मुंबई इगतपुरी या मार्गावर इंजिनड्रायव्हर.

१—ईश्वरावर मुळींच विश्वास नाहीं. कारण ईश्वराचें अस्तित्व पटवून देणारा एकहि प्रसंग माझ्या आयुष्यांत घडलेला नाहीं.



२—धर्मावरहि मुळींच विश्वास नाहीं. मी धर्म मानतो तो केवळ माणुसकीच्या धर्मावर, माणसाच्या सद्भावनेवर आधारलेल्या आचारावर. धर्मावर विश्वास नसण्याचें कारण असें कीं आज धर्मांत बुवाबाजी आणि व्यापार शिरला आहे. पंढरपूर येथें बडव्यांचें प्रस्थ आहे, तर त्याचें अधिक सुसंस्कृत आणि शिस्तबद्ध स्वरूप शिरडीला आढळतें. लोकांच्या श्रद्धेचा असा गैरफायदा घेणारा धर्म मला मुळींच पसंत नाहीं.

३—मी कोणाचीहि पूजा करीत नाहीं. अगर कोणत्याहि धार्मिक पुस्तकाचें वाचन करीत नाहीं. यापेक्षां जिवलग मित्रावर अगर प्रेमळ नातेवाईकावर लोभ करणें आणि उत्तम पुस्तकें वाचणें हें मला अधिक पसंत आहे. माझ्या घरांत सर्व देवांचे आणि सर्व संतांचे फोटो लावले आहेत ते माझ्याकडे येणाऱ्या जाणाऱ्याच्या सोयीसाठीं.

४—आयुष्यांत आतांपावेतों अतर्क्य असें कांहींच घडलेलें नाहीं. इंजिनवरच्या माझ्या गेल्या १५ वर्षांच्या कारकीर्दींत आतांपर्यंत ३८ मानवी जीव अपघातीं बळी पडले आहेत. गाई-म्हशी यांची तर गणतीच नाहीं. जिवावरचे अनेक प्रसंगांतून मी मोठ्या शर्थीनें निभावलों आहे. याला परमेश्वर कारणीभूत नसून माझी स्वतःची अक्कलहुशारी आणि प्रसंगावधान. प्रत्येक गोष्टीला कांहींतरी कारण असतेंच अशी माझी श्रद्धा आहे. पण तें कारण म्हणजे परमेश्वर मात्र नव्हे.

अनुक्रमणिका






# उंट छाप सिन्नर बिडी



**बस्तीराम नारायणदास महेश्री**

**मु. सिन्नर, (नाशिक)**



अनुक्रमणिका



*—आणि मृदुला गेलीं तरीं एकच व्याकुळ विकल विचार तिच्या मनांत राहून राहून लाटेसारखा फुटूं लागला—हेंच देविदासच्या कानीं आधीं पडलं असतं तर...*

जयवंत दळवी

दोन्हीं कुशींना दोन उशा टेकवून देविदास खाटेवर बसला. झोपून झोपून पाठीचा कणा ठणकूं लागला म्हणून तो बसला एवढंच. पण वाटत होतं, अजून थोडं पडावं, झोपून रहावं. झोप न आली तर नुसते डोळे मिटावे आणि पडून रहावं—कोनाड्यांतल्या एखाद्या काठीसारखं !

पण डोळे मिटून पडून राहणं दिसतं तेवढंसं साधं सोपं नाहीं. डोळे मिटले म्हणजे वेडेवांकडे, विचित्र अभद्र विचार अवचित गर्दी करतात...एकदांचा अखेरचा झटका येऊन ठार झालों आहे... इंद्रायणी आपल्या थंडगार पायांवर मस्तक ठेवून रडते आहे, राज कावराबावरा होऊन हुंदके देतो आहे, लोक जमले आहेत, कुजबुज, हुंदके, इशारे...यांची सरपट चालू आहे...असले हे विलक्षण चमत्कारिक विचार आले म्हणजे मोठ्यानं हुंदका देऊन रडावं असं वाटूं लागतं. मिटलेल्या पापण्यांतून टप् टप् टिपं ठिबकूं लागतात. खरं म्हणजे, चोरटं कां होईना यांतहि थोडं सुख आहे. यांतहि थोडी सुटका आहे. थोडा दिलासा आहे...

पण अशा भावनावेगानं हा विकार वाढेल आणि कदाचित त्यांतच अखेरचा झटका येईल असा सक्त इशारा डॉक्टरनीं दिला होता. म्हणून तें नसतं सुख दूर सारणं भाग होतं.

म्हणूनच देविदास उठून बसला.

कांहीं वाचायचं नाहीं. विचार फारसा करायचा नाहीं. मनावर ताण ठेवायचा नाहीं. डोकं शान्त आणि संथ ठेवायचं...डाव्या हाताच्या अंगठ्यानं उजव्या हाताच्या अंगठ्याचं नख त्यानं बराच वेळ खरवडलं. मग त्याहि लीलेचा त्याला कंटाळा आला. म्हणून बिछान्यावर संथपणें हाताचा तळवा फिरवीत त्यानं शुभ्र चादरीवरील प्रत्येक बारिकसारिक सुरकती नाहीशी केली. एखादी लांब चिंचोळी सुरकती पाहून, त्याच्या मनांत यायचं, देहावर चादर पसरली म्हणजे मीहि असाच दिसेन...छे ! असला विचार येतां कामा नये मनांत. शहाणपणानं आवेग आवरलाच पाहिजे.

"राज, काय करतो आहेस तिथं ?"

"घर बांधतोय—" राज रंगीबेरंगी ठोकळे उभे करीत होता. पण उभारणीआधींच पडझड होत होती.

"पपा, अजून कशी नाहीं आली आई ?"

"येईल आतां..." देविदासनं केवळ सरावानं मनगट पाहिलं. त्या मनगावर किती तरी दिवस त्यानं घड्याळ बांधलं नव्हतं.

इंद्रायणी अद्याप आली नव्हती. त्यामुळें तो अस्वस्थ झाला होता. खरं म्हणजे पांच दहा मिनिटंच उशीर झाला होता. पण दोन चार तासांचा उशीर झाला असं त्याला वाटलं.

यापूर्वीं कधीं त्यानं बायकोला नोकरी करूं दिली नव्हती. बायकांनीं घरं सांभाळावीं, नेटका संसार करावा. पुरुषांनीं उद्योगधंदा करून पैसा आणावा आणि बायकांना सुखांत ठेवावं हीं देविदासचीं ठाम मतं. पण विनपगारी रजा सुरू होतांच इंद्रायणीला बाहेर पडणं भाग पडलं होतं. कॅनवासवर कुंचले फिरवणं भाग पडत होतं. छंदाला धंद्याचा साज देणं नशिबीं आलं होतं.

अनाठायीं आहे हें कळूनसुद्धां एकाएकीं तो विचार आलाच—मिसेस् रेगे ओव्हरटाइमचं निमित्त करून प्रवीडबरोबर काळोख पसरेपर्यन्त कॉजवेवर हिंडायची. त्यामुळें ऑफिसमध्यें तिची टिंगल व्हायची. इंदाचीहि अशीच टिंगल होत असेल का ?...खरंच येऊं नये तो विचार अनाठायीं वर आला. इंद्रायणी तशी नाहीं...ती मुळींच तशी नाहीं...त्याचं मन चुरचुरूं लागलं.

## २

पण संशय घेऊं नये म्हटलं तर—

इंदानं गेल्या रविवारीं थालिपीठ कां केलं ? चटणी एवढी तिखट कां केली ? मला तिखट आवडत नाहीं, गोडधोड आवडतं हें काय तिला माहीत नाहीं ?...दहा वर्षं संसार केला. आणि तरीहि माझ्या आवडीनिवडी तिला माहीत नसाव्यात ?...कीं तिनं थालिपीठ मुद्दामच केलं ?...चटणी जाणूनबुजून तिखट केली ?...मी गोड खायचं नाहीं, साखर वाढण्याचं भय आहे असं डॉक्टरनीं सांगितलं आहे हें खरं ! पण मग थालिपीठच कां ? पोहे कां नाहींत ?

...आणि आधीं न कळवतां देवदत्त कसा दत्त म्हणून हजर झाला ?—अगदीं आधीं आमंत्रण दिल्यासारखा ? त्यानं यायचं आणि माझ्या घरीं, माझ्या देखत थालिपीठ खाऊन जायचं असं आधींच ठरलं नव्हतं कशावरून ?...ठरलं असेलहि. ठरलं नसावं म्हणावं तर आपल्याला थालिपीठ फार आवडतं असं मिटक्या मारीत देवदत्त कां म्हणाला ?—आणि चटणीहि हवी तेवढी तिखट झाली असा अभिप्राय त्यानं कां दिला ?...हा अपघात कीं बोलाफुलाची गांठ ?...कीं माझ्या दैवगतीचा हीं दोघं फायदा घेताहेत ?—मी असा बिछान्याला खिळलों म्हणून—?

...उगीच नाहीं भामटा अविवाहित राहिला आहे. दिसायला देखणा, गोरागोमटा, नखरेबाज, बायकी थाटाचा ! आर्ट स्कूलचा व्हाइस-प्रिन्सिपॉल, भरपूर पगार, आणि पुन्हा अविवाहित ! वय चाळिशीकडे आलं तरी अविवाहित—कशासाठीं राहिलाय अविवाहित ? उगीच नसेल...

कानशिलाकडनं मस्तकावर नव्यानं दिसूं लागलेली शीर तणतण ठसठसते आहे याची त्याला वेळींच जाणीव झाली. असं चिडून चालायचं नाहीं, खरं म्हणजे या परिस्थितींत डोकं थंड ठेवायला हवं, मेंदू शान्त हवा. नाहीं तर—

" राज, झालं कीं नाहीं तुझं घर ? कीं अजून विटा पडतातच आहेत ? " संतापकारक विचार विरघळावेत म्हणून हा प्रयत्न.

पण राज उत्तरला नाहीं. कारण अखेरची वीट रचली जात होती.

" आऽऽई आऽऽलीऽऽ" सारा मनोरा ढळढळ खालीं कोसळला.



राज इंद्रायणीला बिलगला, आणि तिच्या लुगड्याच्या निऱ्यांत त्यानं आपलं तोंड लपवलं. राजच्या केंसावरून हात फिरवीत तिनं थकल्याभागल्य नजरेनं देविदासकडे पाहिलं. ती पाहते आहे हें माहीत असूनसुद्धां चादरीवरल्या सुरकुत्या नीट करण्यांत तो दंग झाला.

" कुणी आलं होतं ? " तोंडावर पदर फिरवीत तिनं विचारलं.

" कां ?—कुणी येणार होतं ? "

इंद्रायणीला उत्तर द्यावंसं वाटलं नाहीं. शब्दानं शब्द वाढतो. देविदासाला रोखठोक उत्तर देऊन चिडवण्याची ही वेळ नव्हे हें तिला माहीत होतं. दीर्घ आजारामुळें त्याच्या स्वभावांत किरकिरेपणा आला आहे हेंहि ती जाणून होती.

" आत्याबाई आल्या होत्या !" उगीच संशयी नजरेनं तिच्याकडे पहात देविदास पुटपुटला.

" मग एवढ्या लवकर गेल्या ? "

" तुलाच उशीर झाला ना ? " उत्तराची अपेक्षा होती. पण इंद्रायणी गप्प बसली.

" तुला चिठ्ठी ठेवलीय तिनं. "

" काय लिहिलंय ? "

" मी कशाला वाचूं ? "

" वाचलीत म्हणून काय झालं ? "

" पण हीच तेवढी कशाला वाचायची ?—बाकीचीं पत्रं मी कुठं वाचतोय ? आणि तूं तरी कुठं म्हणतेस वाच म्हणून ? "

" बाकीचीं म्हणजे कुठलीं ? "

देविदास गप्प राहिला. कांहीं बोललाच नाहीं. बसून पाठ दुखायला लागली म्हणून गुडघ्यावरलं पांघरूण अंगावर ओढीत तो पुनः आडवा झाला. कुशीवर वळून त्यानं इंद्रायणीला न्याहळलं.

ती चिठ्ठी वाचत होती...अभिषेकाचं भटजींना सांगितलं आहे. शिवाय नेहमीं हिरवा चूडा भरावा, हिरवं वस्त्र नेसावं नि अंबाड्यांत फूल माळावं असा त्यांचा निरोप आहे. असं केल्यानं सौभाग्य—? (सौभाग्य हा शब्द खोडला होता !) घरच्या बाईला बरं असतं...

खोडलेल्या शब्दानं इंद्रायणीच्या मस्तकांत काहूर उठवलं. तिच्या कानांतून उष्ण वाफा निसटूं लागल्या. डोळ्यांच्या कडा जळजळूं लागल्या. अगतिकपणें तिनं पत्राची घडी केली आणि मेजावरल्या घड्याळाखालीं ठेवून दिली.

हें पत्र मात्र हिनं घड्याळाखालीं उघड्यावर ठेवलं...देविदास स्वतःशींच मनांतल्या मनांत कुरकुरला.

" तूं अशी गप्प कां ? "

" उगीच ! " कातरता तिनं चटकन् लपवली.

" आज तूं अधिक थकली आहेस. स्कूलमधलं वातावरण ठीक आहे ना ? " त्याच्या चटकन लक्षांत आलं, आपण वातावरण या शब्दावर भर द्यायला नको होता. फटकन् ती मान वर करील असं त्याला वाटलं होतं. पण तसं घडलं नाहीं. उलट ओचा खोचून ती लगेच घरकामांत गर्क झाली.

## ३

मेणाच्या बैठकीवर लालबुंद कुंकवाचा टिळा दाबतां दाबतां इंद्रायणी म्हणाली, " आज सुट्टी आहे तर कित्तीं बरं वाटतंय ! मला कधीं संवय नाहीं नोकरी करायची. हौस म्हणून चित्रं काढणं वेगळं आणि नोकरीसाठीं चित्रं काढणं अगर शिकवणं वेगळं. आठ तास दडपणाखालीं काम कारायचं म्हणजे—"

"—दडपण कसलं ? " दडपण या शब्दांत कांहीं तरी दडलं असावं असं त्याला वाटलं.

" दडपण नाहीं तर काय ? अधिकाऱ्यांकडनं उणं अधिक बोलून घ्यायला नको म्हणून मान मोडून काम करावं लागतं. आणि न करावं तर—"

" चालायचंच. आणखी थोडे दिवस ! "

देवावर कुंकू ओवाळून तिनं नमस्कार केला.

" इंदा, आज तूं खरंच इतकी सुंदर दिसते आहेस—दहा वर्षांपूर्वीं लग्न करून आपण एकत्र आलों तेव्हांची आठवण होते आहे. "

खूप दिवसांनीं इंद्रायणी मनाजोगती हंसली.

" कां ? "

" हिरवी साडी, हिरवा चूडा, तीनपेडी वेणी–"

अंबाड्याला लटका हात लावीत ती पुनः एकदां नव्या नवरीसारखी हंसली.

" खरंच इंदा, पण आज काय आहे एवढं ? "

" कां ? "

" हिरवी साडी, हिरवा चूडा, वेणी–"

" सहजच " चिठ्ठींतल्या खोडलेल्या शब्दाची तिला कडवट आठवण झाली.

सहजच हा शब्द मनांत घोळवीत देविदास उताणा झाला.

कॉटच्या कडेवर बसून इंद्रायणी त्याचे पाय आवळूं लागली.

"—आणि रजेच्या दिवशीं तुला हे श्रम ! "

तिनं फक्त मान उडवली लाडिकपणें. पण कांहीं बोलली नाहीं.

## ४

बंद दरवाजावर नाजुकशी तर्जनी टकटकली.

इद्रायणीनं दरवाजा उघडला.

" या ना–या ! "

देवदत्त आंत आला. म्हणाला,

" यांची प्रकृति बघायला आलोंय. "

देवदत्ताला पहातांच देविदासचं तोंड कडवट झालं. त्याला वाटलं, चुकलं आपलं. आधींच झोपेचं सोंग घ्यायला हवं होत.

मोठ्या आपुलकीनं देविदासाच्या पायावर हात ठेवून देवदत्त खाटेच्या कडेवर बसला. म्हणाला, " कशी आहे तब्येत ? बरं वाटतंय ना ? "

केवळ भाग आहे म्हणून देविदास हंसला. त्यानं थंड राहून बराच वेळ देवदत्ताचा चेहरा न्याहळला. जातां जातां त्याच्या मनांत पुसटसा विचार आला, मी देवदत्ताच्या जागीं जन्माला आलों असतों तर किती सुखी झालों असतों. छकडा दिसलो असतो. कलावन्त म्हणून मिरवलं असतं. मृदुला मानेसारख्या पोरी भाळून वेड्या झाल्या असत्या.

" आतां बरं वाटेल तुम्हाला. भरपूर विश्रांति घ्यायला पाहिजे. "

देविदासला वाटलं, कांहीं तरी बोलायला पाहिजे म्हणून हा बोलतो आहे. हा खरं मला बघायला आलेलाच नाहीं. छातीवर भार ठेवावा तसा त्याचा श्वासोच्छ्वास होत होता. वाटत होतं, डावी लाथ उचलून ताडकन् मारावी नि त्याला खाटेखालीं आडवा पाडावा. विकल झालेल्या उजव्या पायाच्या नसा तणतण ताणूं लागल्याची त्याला जाणीव झाली.



## दुपार हिरवी

रसरसलेली दुपार हिरवी
हिरवें जंगल, हिरवी राई
हिरव्या हिरव्या पन्हाटीतुनी
कापुस वेचित हिरवी बाई

हिरवी साडी, चोळी हिरवी
दंडावरची गोंदण हिरवी
गहिऱ्या तरण्या नजरेमधली
सावध चंचल हरिणी हिरवी

बिल्वर हिरवे, किणकिण हिरवी
ओठावरची गुणगुण हिरवी
अंतरांत अन् खवघडलेली
उत्सुक आतुर प्रीति हिरवी

सभोवतीची शांती हिरवी
ओहळांत पडछाया हिरवी
निःपंकोचें जळीं नाहते
मत्स्यकन्यका दुपार हिरवी

— गुणाकर देशपांडे

" चहा ठेव ना ! " तो कसंबसं नको होऊन पुटपुटला. खरं म्हणजे त्या निमित्तानं त्याला इंद्रायणीच्या चेहऱ्याकडे पहायचं होतं.

" छे–छे ! मुळींच नको चहा ! " ताडकन् उठत देवदत्त म्हणाला, " खरं म्हणजे मी या बाजूला एका मित्राला भेटायला आलों होतों. म्हटलं जातां जातां उभ्याउभ्यानं तुम्हाला पाहून जावं. "

देविदास उसनं हंसला.

मग कांहीं तरी बोलावं म्हणून म्हणाला, " अमेरिकन टाय ? "

" छे ! इटालियन. कसा आहे रंग ? "

" सुंदर ! " त्याची छाती अकारण धडधडली.

" हा हिरवा रंग माझ्या फार आवडीचा आहे. "

" चहा आत्तां होईल कीं ! " इंद्रायणी मध्येंच म्हणाली.

" पण वेळच नाहीं. मी पुनः येईन. नाहीं, तरी पुनः थालिपीठ खायला यायचंच आहे. त्या दिवशींची चव अजून जिभेवर आहे. " बुड्बुड् पाय उडवीत तो बायकी ऐटीनं निघून गेला.

तो निघून गेला आणि खोलींत भयानक शांतता पसरली. थेट स्मशानासारखी !

पण देविदास वरवर शान्त दिसला तरी त्याचा मेंदू फुटूं घातलेल्या गळवागत ठसठसत होता. शरीराची नस न् नस यातनांच्या आगींत जळत होती.

मग शान्त राहणं झेपेना म्हणून देविदास खरखरीत आवाजांत म्हणाला, " म्हणूनच हा हिरवा साज वाटतं ? "

इंद्रायणी बोलली नाहीं. काय बोलायचं ?

" काय बोलशील तूं ? " देविदासचा आवाज बेसुमार गुदमरला.

टकलावरल्या दोन तीन हिरव्यागार टपोऱ्या शिरा तट तट तटतटूं लागल्या. पंपानं हवा भरावी तसा श्वासोच्छ्वास होऊं लागला.

मिसेस् रेगे–द्रवीड पुनः त्याच्या नजरेंत झळकून गेले. मृदुला मानेची आठवण ठसठशीत झाली.

"...मृदुला माने आणि आतां तूं...जा ज्जा–झक मार त्याच्याशीं..."

" असं काय करताय हें ? " ती जवळ जवळ किंचाळूनच ओरडली.

त्याला बोलायचं होतं. गरळ ओकायचं होतं. पण त्याला बोलतां येईना. भयाण स्वप्नांत बोबडी वळते तशी त्याची स्थिति झाली. क्षणार्धांत चेहरा लालबुंद झाला. काळसर निळसर झांक आली. मस्तकावरच्या दोन चार नसा टचटचूं लागल्या. डोळे फाटून ताट झाले...आणि मग नाकांतून श्वासाबरोबर रक्ताची पिचकारी आली.

काय होतं आहे तें कळण्याआधींच इंद्रायणी आकांतून किंचाळली.

शेजारीपाजारी धांवत येतात न येतात तोंच तोंडांत घातलेलं पाणी ओठाच्या कडेंतून घरंगळत बाहेर आलं.

त्याच्या थंडगार पावलावर मस्तक ठेवून इंद्रायणी भकासपणें रडूं लागली.

## ५

गेले आठ दिवस स्मृतींना वळसे देत इंद्रायणी रडत होती. डोळे आटत होते. तरीहि नवे कढ, नवे पाझर फुटत होते.

पांढरा फटफटीत चेहरा झाला होता रडून रडून. कुठं तरी कोपऱ्यांत गुडघ्यावर दोन्ही कोपर ठरवून ती तासन्तास बसायची नि हुंदक्या हुंदक्यानं सारं आठवून रडायची. ज्या चमत्कारिक परिस्थितींत हें सारं घडलं ती परिस्थिति आठवली कीं तिला वाटायचं–कुठं तरी गडप व्हावं–देह पुरता छिन्नविच्छिन्न व्हावा.

—आणि मृदुला माने भेटायला आली तेव्हां पुनः एकदां साऱ्या आठवणी बुडबुड्यासारख्या वर आल्या.

—एक वेळ अशी होती कीं मृदुला माने देवदत्ताच्या रूपावर भाळून वेडी झाली होती. खूळ लागल्यागत त्याच्या मागं होती. देविदास आणि इंद्रायणी या दोघांनीहि त्यावेळीं त्यांची पुरेपूर टर उडवली होती. मग एकाएकीं नोकरी सोडून ती स्कूलमधून निघून गेली होती. कुठं तरी बाहेरगांवीं ! त्याहि घटनेवर बरेच तर्ककुतर्क दोघांनीहि चघळले होते.

त्याच मृदुलेनं देवदत्ताचा विषय काढला–आणि तोहि आपणहून ! आतां काय आणखी ऐकावं लागतं या विचारानं इंद्रायणीचा जीव टांगता झाला.

"—आतां पुनः नोकरी करणार आहेस ? " मृदुलेनं थोडंसं चांचपडतच विचारलं.

" काय करणार ?–नाहीं करून कसं चालेल ? "

" तिथंच ? "

इंद्रायणीनं एकदम चमकून पाहिलं.

" कां ?–अशी कां पहातेस ? "

तरीहि इंद्रायणी पहात राहिली.

" देवदत्ताच्या हाताखालीं कशी काम करतेस तूं ? "

" कां पण ? त्यांचं वागणं स्वच्छ असतं असा माझा अनुभव आहे ! "

" फारच स्वच्छ ! " मृदुलेला तुच्छतेनं हंसायचं होतं. पण ही वेळ नव्हती.

" नसतं ? " इंद्रायणीनं विचारलं.

" स्वच्छ न वागेल तर काय ? पुरुष नाहींच मेला तो. सगळाच बायकी थाट ! " इथं मात्र ती अगदीं नाइलाजानं हुंकारून हंसली. सारा तिरस्कार, सारी तुच्छता एका हुंकारांत एकवटून !

तें ऐकून इंद्रायणीला बुडतां बुडतां तरंगावं तसं वाटलं. ती एकदम हलकी झाली. लाह्यासारखं तिचं मन फुललं. जिवावर ओढवणाऱ्या दिव्यांतून सहिसलामत बाहेर पडल्यासारखं तिला वाटलं.

—आणि मृदुला गेली तरी एकच व्याकुळ विकल विचार तिच्या मनांत राहून राहून लाटेसारखा फुटूं लागला–हेंच देविदासच्या कानीं आधीं पडलं असतं तर...

...रंध्र न् रंध्र गुदमरून गेलं. यातनांची कळ अनावर झाली आणि तिचं मन आक्रोश करून रडूं लागलं...

*अफाट काळें आकाश, उफाळणारा अमर्याद समुद्र, दशदिशा भरून टाकणारा मुसळधार पाऊस, आणि या विराट् पसाऱ्यांत मध्येंच डुबकणारीं आमचीं इवलीशीं बोट याशिवाय जगांत दुसरें कांहीं उरलेंच नाहीं.*



# सोनेरी उन्हांत पाचूचीं बेटें

—अनंत काणेकर

आमच्यासारखेच कोलंबोंत तास दोन तास भटकण्याकरतां पिनांगला जाणारा शहा आणि हाँगकाँगला जाणारे बोटीवरले दोन तीन सिंधी मुलगेही आले होते. बोटीवर शाकाहारी अन्न चांगलेंसें मिळत नसल्यामुळें कोलंबोंतल्या एखाद्या दुकानांत भातआमटी किंवा पुरीभाजी खायला शहा उत्सुक झाला होता. थोड्या अंतरावर चालून गेल्यावर एका रस्त्यावर 'मद्रासी ब्राह्मणांचें हॉटेल', 'मलबार हॉटेल' वगैरे इंग्रजी पाट्या दिसल्या. शहा व ते सिंधी मुलगे मद्रासी हॉटेलांत शिरले. आम्ही तिघे पायीं भटकण्याकरतां पुढें निघालों. सिलोनमध्यें परक्या ठिकाणीं आल्यासारखें मुळींच वाटत नाहीं. एखाद्या मद्रासी शहरांत फिरतो आहों, असें वाटतें. फिरत फिरत कोलंबोच्या फोर्ट रेल्वे स्टेशनाकडे आम्ही गेलों. स्टेशनांत शुकशुकाट होता. स्टेशनाच्या आवारांत कांहीं रिक्शावाले होते. तासाला फक्त एक रुपया द्या, आम्ही तुम्हाला सर्व शहर दाखवतों असें म्हणत ते आमच्या मागें लागले. आम्हाला रात्री अकरा वाजेपर्यंत बोटीवर परत जायचें होतें तेव्हां बंदरापासून फार दूर भटकण्यांत अर्थ नव्हता.

मुंबईतल्या कोट विभागासारख्याच कचेऱ्या, मोठमोठ्या इमारती रुंद रस्ते वगैरे असलेला कोलंबोचा भाग बंदराच्या आसपासच आहे. पण रिक्शावाले आमची पाठ सोडीनात एक काळा मद्रासी दिसणारा रिक्शावाला पुन्हां पुन्हां आम्हाला इंग्रजींत सांगत होता, 'Sir, I am an Indian. I wont cheat you!' त्याच्या त्या भ्रातृभावाचा आमच्या मनावर कांहीं परिणाम होणें शक्य नव्हतें; कारण त्याच्या श्वासाश्वासाबरोबर दारूच्या घाणीचा भपकारा बाहेर पडत होता!

कांहीं मोठ्या रस्त्यावर 'फ्री चायना हॉटेल' 'पेपिंग हॉटेल' या नांवाची चिनी उपाहारगृहें दिसलीं. एक चँग-कै-शेक पक्षीय चिन्यांचें असेल तर दुसरें कम्यूनिस्टपक्षीय चिन्यांचें असावें! 'लंका महिला समिती' अशी पाटी एका दुकानावर दिसली, दुकान बंद होतें, पण काचेच्या तावदानामागें लंकेच्या महिलांनीं बनविलेल्या चटईच्या पिशव्या, बायकांच्या मनीबॅग्ज, वगैरे हस्तव्यवसायांचे नमुने दिसत होते. गॉल फेसच्या समुद्रकिनाऱ्याच्या बाजूला गेलों तिथें तुफानी वारा घोंगावत होता. सुदैवानें पाऊस मात्र थांबला होता. रात्रीचे साडेनऊ दहाच वाजले आहेत; पण कोलंबोच्या या चेथेम् स्ट्रीट, यॉर्क स्ट्रीट वगैरे मोठमोठ्या रस्त्यावर माणसांचा शुकशुकाट दिसतो. मुंबईच्या मानानें कोलंबो फार लहान वाटतें.

साडेदहाला धक्क्याकडे परत आलों. बोटीवर पोहोचविणारी लॉंच तयारच होती. इतर फ्रेंच, इटालियन वगैरे बोटीवर परत जाणारे युरोपियन उतारूही लॉंचमध्यें बरेच होते. 'टोस्कानो' नांवाची एक जंगी इटालियन बोट आमच्या बोटीशेजारींच उभी होती. तिच्यावरले कोलंबो पाहून परतणारे बरेच इटालियन स्त्रीपुरुष लॉंच मध्यें होते. नादमधुर आकारान्त आणि इकारान्त इटालियन शब्दांत बायकामुलांची आणि पुरुषांची मोठीच गडबड चालू होती. निळेपिवळे शर्ट आणि लालहिरवे पायमोजे घातलेले ते बांधेसूद देखणे पुरुष आणि खांदे उडवून गोड चिवचिवणाऱ्या त्या रेखींव चेहऱ्यांच्या गुलाबी इटालियन बायका पहातांना, बोटीवरले धीरगंभीर ब्रिटिश पुरुष आणि ओबडधोबड ब्रिटिश बायका पाहून कंटाळलेल्या माझ्या मनाला फार बरें वाटलें! बहुतेक इटालियनांच्या हातांत दोनतीन भलीमोठीं शहाळीं, एखादें दुसरें प्रचंड सिलोनी अननस किंवा केळ्यांचा लांबलचक घड होता. पूर्वेचा हा मेवा संभाळीत, एकमेकांची थट्टा करीत, हंसत खिदळत ही मंडळी चालली होती. 'टोस्काना' बोटीला लॉंच लागली, आणि ते सर्व उतरले. त्यानंतर लॉंच 'कॉर्फ्यू' कडे निघाली. पांढऱ्या, लाल, हिरव्या हजारो विजेच्या दिव्यांनीं लखलखणाऱ्या किती तरी लहान मोठ्या नौका पाण्यावर इतस्ततः डुलत होत्या आणि त्यांच्यावरल्या हजारो दिव्यांचीं हजारो प्रतिबिंबें काळोखानें माखलेल्या समुद्राच्या पाण्यावर नाचत होतीं. बिंब प्रतिबिंबांची ही विचित्र दिवाळी पहात आम्ही 'कॉर्फ्यू' वर उतरलों. रात्रीं साडेबाराला बोटीनें कोलंबो सोडलें.

## ता. १९ मे १९५५.

प्रातरुपाहारानंतर सकाळीं डेकवर आलों तेव्हां लख्ख ऊन पडलेलें पाहून बरें वाटलें. आतां मलायाच्या दिशेनें सारखे चार दिवस आम्हीं सरळ पूर्वेकडे जाणार. हा मॉन्सून वाऱ्यांचा प्रदेश नसल्यामुळें आतां फारसा पाऊस नसेल या आनंदांत होतों. पण संध्याकाळीं सहाच्या सुमाराला आकाश आणि पाणी यानीं महाभारतीय रणभूमीचें स्वरुप धारण केलेलें दिसलें. आकाश काळेकभिन्न झालें होतें. समुद्राच्या अक्राळविक्राळ लाटा उठत होत्या. एवढी मोठी बोट इतक्या अगतिकपणें हालत होती कीं डेकवर पाय ठरेना. अफाट काळें आकाश, उफाळणारा अमर्याद समुद्र, दशदिशा भरून टाकणारा मुसळधार पाऊस, आणि या विराट् पसाऱ्यांत मध्येंच डुबकणारी आमची इवलीशी बोट याशिवाय जगांत दुसरें कांहीं उरलेंच नाहीं कीं काय, असें आजूबाजूला

पहातां वाटूं लागलें. तुफान वादळाचें तें दृष्य अविस्मरणीय होतें. पहावें तिथें निळ्यापाण्याचे हजारो हिमालय वर उठून उभे राहूं पहात होते, आणि त्या सर्वांना पालाण घालूं पहाणारें अफाट, क्रुद्ध, काळें आकाश सहस्रधारांनीं त्यांना झोडपून जणूं काय वर उठूं नका म्हणून दरडावीत होतें! रात्र पडूं लागली तसा पाऊसवारा कमी होऊं लागला.

### ता. २० मे १९५५

कालचें आकाश आणि कालचा समुद्र न पाहिलेल्या अशा एखाद्या माणसाला आज सकाळीं १० वाजतां बोटीच्या डेकवरून जर कुणी आकाश आणि समुद्र दाखवला असता आणि त्यांच्या कालच्या भेदक रूपाचें वर्णन केलें असतें तर सांगणाराला त्यानें साफ खोटें बोलणारा ठरवलें असतें. कालचाच का हा समुद्र ? प्रशांत निळ्या पाण्यावर हंसऱ्या लहरी उठत आहेत, आणि त्यांना हलकेच बाजूला बाजूला करीत बोट कशी सरसरसरसर पुढें चालली आहे.

आज रात्रीं डेकवर 'मॅड्हॅटर्स बॉल' आहे. नाचांत भाग घेणाऱ्या स्त्रीपुरुष उतारूनीं अगदीं वेड्याविद्या टोप्या डोक्यावर ठेवून यायचें. चमत्कारिक टोपी बनविण्यांत ज्यास्तींत ज्यास्त कल्पनाशक्ति दाखवणारांना तीन बक्षिसें देण्यांत येणार आहेत. उतारूमधल्या दोघातिघांची परीक्षकसमिति आहे. भाग घेणारे आणि परीक्षक सर्वच युरोपियन आहेत. अर्थात् कुणाला कसलीच बंदी नाहीं. नाचणाऱ्यांत एखादा पार्शी किंवा सिंधी तरुण दिसतो. सबंध डेक्, खुर्च्या बाजूला काढून मोकळें करण्यांत आलें आहे. सुरत दमणच्या बाजूचे मुसलमान खारवे या बोटीवर शिड्या लावणारे, दोरखंड ओढणारे, डेक धुणारे खलाशी म्हणून काम करतात. त्यांच्यापैकीं दोघे संध्याकाळीं डेकवर पावडर टाकून तें नाचाकरतां गुळगुळीत करीत होते. डेकवरल्या आणि जेवणघरांतल्या दिव्यांनाही रंगीबेरंगी कागद आज लावलेले होते. आज रात्रीं जेवणघर किंवा डायनिंग सलून विशेष शृंगारलेलें होतें. जेवणाचा थाटही विशेष होता. निरनिराळ्या मद्यांची नांवें आणि किंमती आजच्या खास रंगीत पुस्तिकेसारख्या मेन्यूकार्डमध्यें दिल्या होत्या.

रात्रीं जेवणानंतर ९ ला 'बॉल्' सुरू झाला. पहिलें बक्षीस मिळविणाऱ्या बाईनें रंगीत कागदाची ताटासारखी टोपी करून मध्यें कलतें 'कॉक्टेल्' मद्याचें ग्लास ठेवलें होतें; तर पहिलें बक्षीस जिंकणाऱ्या पुरुषानें अगदीं साधी पण कल्पनायुक्त टोपी केली होती. एका सफरचंदांत एक तीर आडवा घालून त्यानें तें हनुवटीखालून घेतलेल्या रेशमी फितीनें डोक्यावर बांधलें होतें. या हॅट्चें नांव 'विल्यम् टेल्.' दोघा तरुणांनी डोक्यावर कातड्यांच्या बॅगा ठेवून हनुवटीला त्या पट्ट्यानें आवळल्या होत्या आणि 'हमाल हॅट्' असें नांव दिलें होतें! एकानें सहा रिकाम्या बीअरच्या बाटल्यांची माळ करून ती डोक्याभोंवती गोल बांधली होती, आणि मध्यें अर्धा भरलेला बीअरचा ग्लास ठेवला होता. नांव दिलें होतें 'Tonight in Town!' लंडन ते हॉंगकॉंग एक महिना



बोटीवर काढायचा असतो, तेव्हां नानाप्रकारचे गंमतीचे कार्यक्रम युरोपियन उतारू शोधून काढतात. कसा तरी प्रवास करणें त्यांना पटणारच नाहीं. जीवन जगण्याकरतां आहे हा तर त्यांचा बाणा.

### ता. २१ मे १९५५

आकाश स्वच्छ निळें दिसतें आहे. सोनेरी उनांत समुद्राचें पाणी इंद्रनील मण्यासारखें चमचमतें आहे. परवांचा समुद्र अक्राळविक्राळ राक्षस तर आजचा समुद्र राजबिंडा तरतरीत तरुण! सकाळचे दहा वाजले आहेत. उजव्या हाताला एक हिरवेंगार चिमुकलें बेट दिसतें आहे. पलीकडे दूर निळसर डोंगरांच्या रांगा दिसतात. दुपारी बाराला सुमात्रा बेटाच्या टोकाजवळून आम्ही जाणार. अकराच्या सुमारास एक मोठ्या बेटाच्या इतक्या जवळून आम्ही जात आहोंत, कीं डोंगरावरली हिरवळ, डोंगरांतलीं लाल छपराचीं घरें आणि किनाऱ्यावरलीं तुरळक पांढरीं घरें चांगलीं दिसत आहेत. दुपारीं अडीच नंतर सुमात्राचे डोंगर दिसूं लागले. सुमात्रा, जावा हींच तीं लहानपणीं इतिहास भूगोलांत वाचलेलीं मसाल्याचीं बेटें! लहानपणीं वाटे या बेटांवर मसालाच मसाला जिकडेतिकडे असेल. प्रौढपणीं कळलें कीं मसाल्याचीं बेटें म्हणजे दालचिनी, लवंग वगैरे मसाल्याला लागणाऱ्या गोष्टी इथें खूप पिकतात म्हणून हीं मसाल्याचीं बेटें!

### ता. २२ मे १९५५

आज सकाळीं सात साडेसातला बोट पिनांग बंदराला लागायची होती. सकाळीं सहाला जागा झालों, आणि केबिनच्या पोर्ट होलमधून बाहेर पाह्यलं तेव्हां लालमातीचे डोंगर, त्यावर अधूनमधून लुकलुकणारे दिवे पांढरीं घरें अशा प्रकारचें, विजयदुर्ग, जयगड वगैरे आपल्याकडल्या कोंकणच्या बंदरांत पहांटेच्या वेळीं बोट शिरतांना ज्या प्रकारचें दृश्य दिसतें तसेंच दृश्य दिसत होतें. बोट बंदरांत शिरतांना जे खड्खड् थड्थड् आवाज होतात ते होत होते. तोंड धुणें वगैरे आटोपून सात वाजतां डेकवर गेलों. बोट उभी राहिली होती, आणि शिड्या वगैरे लावावयाचें काम चालूं होतें. बोट आंत शिरतांना कोंकणच्या बंदराची आठवण झाली, पण आतां धक्क्याला लागली होती तेव्हां धक्का चांगला लांबरुंद, मोठमोठ्या घरघर करणाऱ्या याऱ्या, पेट्यांचे ढीग, हमालांची धांवपळ वगैरे मुंबई बंदरासारखें दृश्य दिसत दिसत होतें. मुंबई सारख्याच सकाळीं सात वाजतांच अंगांतून घामाच्या धारा निथळत होत्या. बंदराच्या पलीकडे मशिदीच्या सारखा घुमट असलेला एक पांढऱ्या रंगाचा घड्याळाचा मनोरा दिसत होता. त्या घड्याळांत साडेसात वाजलेले होते, घड्याळ अर्धातास पुढें करावयाला विसरल्यामुळें माझ्या घड्याळांत सात वाजले होतें. घड्याळें अर्धातास पुढें करण्याची बोटीवर रात्रींच सूचना देण्यांत आली होती.

धक्क्याला लागलेली बोटीची बाजू सोडून दुसऱ्या बाजूला जाऊन उभा राहिलों तीं किती तरी मोठमोठ्या बोटी बंदरांत उभ्या असलेल्या दिसल्या. पलीकडे दूर मलयाच्या मुख्य भूमीचा किनारा दिसत होता. कारखान्यांचीं धुरांडीं, कांहीं पांढऱ्या काळ्या इमारती अस्पष्ट दिसत होत्या. पिनांग हें मलायाचें

एक मोठं बंदर आणि एक सुंदर बेट म्हणून प्रसिद्ध आहे. बोटीवर आलेल्या अधिकाऱ्यांनीं पासपोर्टची तपासणी केली, इतर कागदपत्र पाह्यले, आणि आम्ही पिनांग पहाण्याकरतां बाहेर पडावयाला मोकळे झालों. रात्रीं बारा वाजतां सिंगापूरला जाण्याकरतां बोट पिनांग सोडणार होती. बोटीवर प्रातरूपाहार घेतला आणि साडेआठच्या सुमाराला डेकवर जाऊन धक्क्याकडे पहात. पुढें काय करावयाचें याचा विचार करूं लागलों. कोलंबोचे एक बॅरिस्टर सेल्वरत्नम् तिलक मुथु कोलंबोपासून आमच्याबरोबरच बोटीवर होते. पिनांग-मध्यें ते प्रॅक्टीस करतात. बायकोला आणि लहान मुलाला घेऊन कोलंबोहून ते पिनांगला परत आले होते. उतरण्याच्या तयारींत ते डेकवर उभे होते. 'काय हो, तुमच्या पिनांगमध्यें उतरायला हरकत नाहीं ना ? मलायाच्या जंगलांत कम्यूनिस्ट बंडखोर आहेत, आणि मधून मधून रबराच्या मळ्यावर किंवा कुणाच्या घरांवर छापे घालून ते दिसेल त्याला ठार करतात नी लूटमार करतात असं वर्तमानपत्रांत आम्ही वाचतों !', मी सेल्वरत्न-मूनां थट्टेनें म्हणालों. 'छे हो,' ते हंसत म्हणाले, 'त्याची तुम्हाला काळजी नको. पहिली गोष्ट म्हणजे आमच्या पिनांगमध्यें कुठें कुणाचे छापे पडत नाहींत. मलायाच्या मुख्य भूमीवरल्या खेड्यापाड्यांवर अधूनमधून हल्ले होतात. पण तुमच्या सारखे लोक तिथें गेले तरी त्यांना भीति नाहीं. बड्या भांडवल-दारांवर आणि युरोपियन मळेवाल्यांवरच कम्युनिस्ट दहशतवाद्यांचा दांत आहे. तुम्हाला कांहीं करणार नाहींत तें !'

धक्क्यावर धांवपळ करीत असलेल्या यात्र्या-वरून माल चढवीत उतरीत असलेल्या मजूरां-कडं पहातांना आपण मद्रासकडल्या एखाद्या बंदरांत आहोंत असें वाटत होतें. बहुतेक मजूर मद्रासकडले तामीळ होते. शेंपन्नास मजूरांत दोनचारच ठेंगू, बारीक डोळ्याचे गुरख्यासारखे दिसत होते. हे एतद्देशीय मलायी. सेल्वरत्नम् म्हणाले, 'मलायी लोक एकंदरींत फार आळशी. इथल्या मळ्यांत, कारखान्यांत तुम्हाला हिंदी तामीळ लोकच बरेचसे दिसतील. मलायी आपला पिढीजाद शेतीचा किंवा मासेमारीचा व्यवसाय करीत मिळेल तें खाऊन स्वस्थ रहातात. मोठे मळे, कारखाने, बँका, ब्रिटिशांच्या; व्यापार, उदीम, मजूरी यांत चिनी आणि हिंदी लोकांचा भरणा. मलयांत मोठं विचित्र त्रांगडं आहे. मलयांत मलायी लोक आतां अल्पसंख्यांक झाले आहेत ! पिनांग सिंगापूर सारख्या मोठ-मोठ्या बंदरांत आणि शहरांत चिनी लोकच बहुसंख्य आहेत. पण एकंदर मलयांत पंचेचाळीस टक्के मलायी, चाळीस टक्के चिनी आणि पंधरा टक्के हिंदी लोक असे प्रमाण आहे !'

आपल्याकडे काथ्याच्या पायपुसणी अस-असतात तसले कसले तरी जाडजाड चौकोनी तुकड्यांचे ढीग धक्क्यावर दिसत होते आणि मजूर हातगाड्यावरून इकडून तिकडे नेत होते. हें काय म्हणून सेल्वरत्नमूना विचारलें; तेव्हां ते म्हणाले, 'हा मलयांतला रबर, हें तर मलयाचें धन. जगांतला ऐंशीं ते नव्वद टक्के रबर मलयांत होतो हें तुम्हाला माहीत असेलच.'

पिनांगमधल्या पहाण्यासारख्या स्थळांची माहिती देणारीं कार्डें बोटीवर रात्रींच आम्हाला देण्यांत आलीं होतीं. तीं हातांत घेऊन बाहेर पडण्याचा विचार करीत आम्हीं डेकवर बसलों होतों. इतक्यांत दोन गुजराथी मुलगे एक पत्र हातांत घेऊन कुणाला तरी शोधीत डेकवर फिरत असलेले दिसले. ते आमच्या चांदूरकरांना शोधीत होते. चांरदूकरांचे चिरंजीव कांहीं महिन्यापूर्वीं पिनांगमध्यें येऊन गेले होते. त्यावेळीं पिनांगमधले एक प्रतिष्ठित हिंदी व्यापारी एस. ठाकोरलाल यांची आणि त्यांची चांगली ओळख झाली होती. आपले वडील अमक्या बोटीनें अमक्या दिवशीं पिनांगला येताहेत म्हणून त्यांनी ठाकोरलालांना पत्र लिहिलें होतें. पत्रासह चांदूरकरांना घरीं घेऊन येण्याकरतां तें पत्र देऊन ठाकोरलालांनीं आपला भाचा मोहन आणि पेढीवरला दुसरा एक मुलगा रमण या दोघांनां बोटीवर पाठविलें होतें. पिनांग पहाण्याचा आमचा प्रश्न इतक्या गोडपणें सुटलेला पाहून आम्हाला अतिशय आनंद झाला, आणि त्या दोन मुलांबरोबर आम्ही बोटीवरून खालीं आलों.

चुलीया स्ट्रीट्मध्यें ठाकोरलालांचे घर व पेढी होती. हीं दोन मुलें अतिशय चलाख होतीं. बंदराबाहेर दोन माणसांची सोय असलेल्या पुष्कळ सायकल रिक्शा उभ्या होत्या. चिनी रिक्शावाल्याबरोबर अस्खलित मलायी—भाषेंत मोहन आणि रमण बोलत होते. 'सानुरिंगी,' 'सानुरिंगी,' 'चुलिया स्ट्रीट' असे शब्द आमच्या कानांवर पडत होते. 'सानु' म्हणजे एक आणि 'रिंगी' म्हणजे 'डॉलर'. मलायी डॉलरची किंमत साधारण-पणें एक रुपया नऊ आणे आहे. बोटीवर दहा रुपयांची नोट देऊन सहा डॉलर आणि चाळीस सेंट मी घेतले होते. एका डॉलरचे शंभर सेंट. सेंटला मलायी लोक 'पैसा' म्हणतात. एका 'रिंगी'चे शंभर 'पैसे'. चिनी रिक्शावाल्यांची टोपी मोठी मजेदार दिसते. नव्वें लहानसा कळस अस-लेली, भल्या रुंद उथळ टोपलीसारखी विण-लेल्या वेताची ती असते. बारा महिने कडक ऊन, आणि रोज. संध्याकाळीं थोडाबहुत तरी पाऊस अशा या विषुववृत्ताजवळच्या प्रदेशांत हें शिरस्त्राण चांगलेंच उपयोगी आहे.

दोन रिक्शा ठरवून एकींत मी आणि मोहन, दुसरींत चांदूरकर आणि बोबडे असे आम्ही चुलीयास्ट्रीटमध्यें जायला निघालों. रमण पायींच घरीं जातों म्हणाला. मुख्य रस्त्यावर आल्यावर चार्टर्ड बँकची भव्य नवी इमारत आणि हाँगकाँग-शांघाय बँकिंग कॉर्पो-रेशनची इमारत दिसली. पिनांगमधल्या लहानमोठ्या रस्त्यावरून रिक्शा जात असतां एक गोष्ट तावडतोब डोळ्यांत भरली. रस्त्यावर दिसणारीं बहुतेक दुकानें चिन्यांचीं होतीं. लाल अक्षरांतल्या पांढऱ्या पाट्या किंवा काळ्या अक्षरांतल्या पिवळ्या पाट्या बहुतेक चिनी भाषेंतल्याच होत्या. एका गल्लींतल्या बऱ्याचशा चहाच्या हॉटेलांत आणि इतर दुकानांच्या गाद्यांवर मोपल्यां-सारखे दिसणारे मद्रासी मुसलमान दिसले. दुकानांवरल्या इंग्रजी पाट्याहि अबूबकर, मुथू उस्मान अशा प्रकारच्या नांवाच्याच होत्या. पिनांग शहराचा हा दुकानें पेठ्या, बाजाराचा भाग जुना असावा. डहाणू किंवा पालघरच्या बाजूला जशीं एकमजली लाकडी गॅलऱ्यांची घरें दिसतात तसलींच घरें इथें दिसलीं. मात्र पालवर, डहाणूला नाहींत असें रुंद, स्वच्छ डांबरी रस्ते आणि मोटारी, ट्रॅमगाड्या वगैरे इथें दिसत होत्या. (अपूर्ण)



अनुक्रमणिका




❋ वाङ्मयचौर्य ❋ पाप ? कसलें पाप ? ❋ कवि यशवंत ❋ मुंबई राज्य कला प्रदर्शन ❋ न रंगलेला संगीत महोत्सव ❋ बियाणींचा शिस्तभंग ❋ या. मु. पाठकांची धुळवड ❋ भारताचें ' समाजवादी (!) अंदाजपत्रक. ❋ हिंदी क्रिकेटचा ' फार्स ' वगैरे.

## साहित्य

### वाङ्मयचौर्य

"वाङ्मयचौर्या " विषयीं आज मराठींत पुन्हां वाद चालू आहेत. आरोप केले जात आहेत, व पुरावे दिले जात आहेत. आरोप नाकारले जात आहेत आणि स्पष्टीकरणें दिली जात आहेत. हे सारे सोहाळे नवे नाहींत. कदाचित् वाङ्मयचौर्य हे वाङ्मय-निर्मितीइतकेंच जुने असेल. कारण चोरीचा मोह हा माणसाच्या रक्तांतला एक जुना मोह आहे. वाङ्मयचौर्य हें संस्कृतप्रचुर वर्णन कांहींसें शहाजोग वाटतें. चोरांची संख्या जों जों वाढत जाईल तों तों ह्या शब्दाचा शहाजोगपणाहि वाढत जाईल. साव अल्प-संख्येंत आले म्हणजे हा शब्द पूर्णपणें शहाजोग ठरेल. मग चोर हे राजमान्य ठरतील व राजमान्य हे चोर ठरतील. चोरी-विषयींचा संकोच संपला म्हणजे सारे कांहीं संपल्यासारखेंच आहे. ह्या हर्षखेदातीत आनंदमय अवस्थेच्या फार जवळ आज आपण जात आहोंत. कांहीं लहानमोठ्या प्रमाणांत चौर्यकर्म नेहमींच अस्तित्वांत होतें. पण तेव्हां चौर्यकर्माविषयींची लज्जाहि अस्तित्वांत होती. आतां चोरीविषयींचा आमचा संकोचच सुटत चालला आहे. आणि भल्या-भल्या साहित्यिक असामी चौर्यकर्मांचा शहाजोग व्यापार करूं लागल्यावर शासन तरी कोण कुणाला करणार किंवा न्याय तरी कोण कुणाचा करणार ? चोरी हा वैयक्तिक कर्तत्वाचा अपमान आहे आणि सामाजिक नीतीचा अपराध आहे ही जाणीवच मुळांत लुप्त होऊं लागली आहे. " बोलून चालून हा व्यवहार आहे, " " आजकालच्या जगांत हें असें करावेंच लागतें, " " हें काय सत्ययुग आहे ? " ह्या सारखे धारिष्टवान प्रश्न विचारण्याइतपत प्रगती आजही केलेली आहे. म्हणजे एकूण ह्या दिशेने आमची बरीच वाटचाल झालेली आहे. चारचौघा नव्याजुन्या टीकाकारांकडून " प्रतिभावान " म्हणून वाजविला गाजविला गेलेला एखादा तरुण लेखक चोर असल्याचें सिद्ध होते, आपल्या नाटकांतून गुरुजीपंथाला विनोदी गुदगुल्या करणारा नाटककार चौर्य-कर्माचे गुरुत्व स्वतःच करीत असल्याचें आढळांत येतें. बोलपटांच्या कथानकांची सही सही उचल तर आमच्या इतकी आंगवळणी पडली आहे, कीं तिच्या विषयीं खंत अथवा खेद करण्याच्याहि अवस्थेंत आतां आम्ही नाहीं. कुणी कांहीं स्वतंत्र लिहिलें असेल तर त्याचेच आम्हांला आश्चर्य वाटतें. व त्या भल्यामाणसाकडेच आम्हीं अविश्वासाच्या संशयी दृष्टीनें पाहूं लागतो.

बरें हें सारे करीत असतांच " जीवन मुल्यें " " जीवन निष्ठा " " कलात्मक सत्य " " लेखन तपस्या " आदि गोडगोड शब्दांचा गजर आही चालूच ठेवतों. म्हणजे खिसे कापण्याचा उद्योग करीत असतांच रामनामाचा घोष करण्याइतके आम्ही बोटीव लफंगे आहोंत. आमचे रामनाम हाहि आमच्या धंद्याचाच एक धूर्त भाग आहे.




वाङ्मय रामोशी !

परंतु रामनाम घेत केली तरी चोरी ही अखेर चोरीच आहे. वाङ्मयचौर्य ह्या भारदस्त शब्दाला देखील चोरीचा घाणेरडा भपकारा लपविता येत नाहीं. एकाद्याचे घड्याळ चोरणें, एखाद्याचा कपडा चोरणें, एखाद्याचा दागिना चोरणें व तो आपलाच म्हणून खपविणें अथवा वापरणें हें जितकें माणसाला कमीपणा आणणारें तितकेंच एखाद्याची कल्पना अथवा कथानक चोरणें व ते आपलेच म्हणून खपविणें हे लेखकाला कमीपणा आणणारे कृत्य आहे. ज्याच्या अंगीं निर्मीतीचें कर्तृत्व नाहीं तो चोरीचे कर्तृत्व दाखवितो आणि चोरी ही तर निर्माणक्षमतेला मुळांतच मारक आहे. चोरीची सोपी संवय एकदा लेखकाला लागली म्हणजे निर्माणक्षमतेचा आपोआप ऱ्हास होतो. त्याचे स्वतंत्र कतृत्व आपोआपच संपुष्टांत येते. त्याची बुद्धी आपो-आपच परोपजीवी व परावलंबी बनत जाते. चोरीला चटावलेला माणूस स्वतंत्र उद्योगाची बुद्धी आणि शक्ति अपरिहार्यपणें गमावून बसतो. दुसऱ्याच्या घामानें भिजलेलें महावस्त्र स्वतःच्या अंगावर मिरवितांना त्याला कसलीच किळस वाटत नाहीं, कसलाच संकोच वाटत नाहीं. स्वतः विणलेले जाडेभरडे कापड स्वतः वापरण्यांत जो सन्मान व आनंद आहे तो त्याला उगमतच नाहीं ! कारण असे वस्त्र निर्माण करण्याची इच्छा व शक्ति या दोघांनांही तो पारखा झालेला असतो.

दुसऱ्याचा दारुगोळा उधार अथवा उसनवार घेऊन चारदोन किरकोळ चकमकी जिंकतां येतील पण अखेरची लढाई कांहीं जिंकतां यावयाची नाहीं. चोरी कांहीं काळ यशस्वी झाल्यासारखी दिसेल पण अखेर कांहीं ती कुणाला यश देणार नाहीं. व्यक्तिला नाहीं व राष्ट्रालाहि नाहीं.

चोरी अनीतिकारक तर आहेच पण नीति-अनीतीच्या पल्याड गेलेल्या लेखक महोदयानीं ध्यानांत असूं द्यावें, कीं चोरी ही अंतीं फारशी लाभदायक देखील नाहीं. वाङ्मयाला लाभदायक नाहीं, समाजाला लाभदायक नाहीं, राष्ट्राला लाभदायक नाहीं. कुठल्याहि राष्ट्राच्या न त्या राष्ट्रांतील वाङ्मयाच्या अव्वल निर्माणक्षमतेवर पडलेली भयानक कीड म्हणजे चोरीची संवय. ती कुणाचा उत्कर्ष करूंच शकत नाहीं ! ती कुणाला यश देऊंच शकत नाहीं ! ती कुणाला लाभदायक होऊंच शकत नाहीं.

### पाप ? कसलें पाप ?

आणि तरीही आपल्या समाजांत चोरी लाभदायक झालेली दिसते. कथेगणिक सहस्रावधि रुपये मिळविणारे कांहीं पट्टीचे सिनेलेखक वस्तुतः पट्टीचे चोर आहेत. त्यांचा पैसा चोरीचा आहे. त्यांचे यश चोरीचे आहे. त्यांची कथानकें चोरीची आहेत. आणि ही चोरी त्यानीं उत्तम प्रकारें पचविली आहे. ही चोरी त्यांना उत्तम प्रकारें मानवली आहे. फार लाभदायकदेखील ठरली आहे. कांहीं माल क्वचित् स्वतःचा, उरलेला चोरीचा असा ह्यांचा व्यवहार आहे. चोरीच्या मालावर स्वतःची नाममुद्रा ठोकून तो खपविण्याइतके हे धारिष्ट्वान् व बुद्धिवान् आहेत. आणि ही माणसें धनवंत व कीर्तिवंत देखील आहेत. ह्या माणसांचें यश पाहूनच तरुण लेखकांना चोरीचा मोह होत असतो. "कोण म्हणतो चौर्य लाभदायक होत नाहीं ?" ही तरुण माणसें विचारतात. "पहा त्या अमुकतमुक हिंदी पंडिताकडे; तो स्टोरीचे पन्नास सहस्र घेतो. त्याची प्रत्येक स्टोरी चोरीची आहे. मग आम्हींच काय पाप केलं आहे ?" ह्या प्रश्नांत विलक्षण डंख आहे. आमच्या साहित्यिक व सामाजिक पतनाची समग्र शोकांतिका ह्या एका प्रश्नांत सामावलेली आहे. "पाप करण्यांत आम्हीं कसलें पाप करतों ?" इतका भयंकर हा प्रश्न आहे. वऱ्यावाईटाच्या अगदीं मूलभूत मुद्यांममोरच आम्हीं प्रश्नचिन्ह मांडलें आहे. जीवनाच्या जवळजवळ प्रत्येक क्षेत्रांत पाप लाभदायी ठरत असल्याचा अनुभव अनेकांना येत आहे. लांचलुचपत, वशिलेबाजी, गटबाजी अनेक क्षेत्रांत यशस्वी होत असल्याचे आम्हीं पहात आहोंत. साहित्याचे व शिक्षणाचे पवित्र क्षेत्रही अनीतिमान राजकारणानें ग्रासून टाकल्याचे आम्हीं पहात आहोंत. म्हणून आम्हांला प्रश्न पडतो कीं "पाप करण्यांत कसलें पाप आहे ?"

ह्या विद्रूप प्रश्नांतच आमच्या राष्ट्रीय सर्वनाशाचे बीज आहे. ह्या प्रश्नाला उत्तर इतकेंच कीं पाप कांहीं काळ यशस्वी झाल्यासारखें दिसते परंतु ते यश केवळ आभासात्मक असते. चोरी अथवा फितूरीसारख्या पापानें एखाद्या व्यक्तीचा स्वार्थ क्षणभर साधत असेलही ! सूर्याजी पिसाळ वा बाळाजीपंत नातू ह्यांनीं असा स्वार्थ साधला होता. पण व्यक्तीचा हा नीच स्वार्थ अंतीं राष्ट्राच्या हिताला मारक ठरतो, समाजाच्या स्वार्थाला मारक ठरतो. आणि समाजाचा स्वार्थ बुडाला म्हणजे व्यक्तींचा स्वार्थहि वाचत नाहीं.

चौर्यकर्मामुळें एखाद्या लेखकाचा स्वार्थ कांहीं काळ साधत असेलही. परंतु चोरीच्या आहारी गेलेलें साहित्य अखेर बुडतेंच बुडतें. जगाच्या उघडया हाटांत त्याला कुठलेंच मोल येत नाहीं. ह्या बुडत्या साहित्यावरोवर त्या साहित्याशीं बांधलेले साहित्यीकही बुडतात. बुडूं घातलेली मराठी बोलपट सृष्टी, हें ह्या अनीतिजन्य अनर्थाचें उत्तम उदाहरण आहे. ज्यांनीं केवळ जवळचा स्वार्थ पाहीला व वैयक्तिक स्वार्थ साधला त्यांचा सामुदायिक व चिरकालीन स्वार्थ बुडतोच बुडतो.

हा सारा विचार किंचित् सूक्ष्म व कांहींसा दूरदृष्टीचा आहे. मूलभूत मुद्यांचा व परमार्थाशीं अगदी सरळपणें निगडीत असलेल्या स्वार्थाचा हा विचार आहे. ह्या पारमार्थिक स्वार्थाचे व नैतिक मुद्यांचे आकलन स्वप्नसृष्टींतल्या साहित्यिकांसही होणार नसले तर त्यांना खरोखरच भविष्यकाळ नाहीं व "सारस्वत" ह्या सन्मान्य उपाधीसही ते सर्वस्वी अपात्र आहेत.

—पु. भा. भावे

• •

### कवि यशवंत

कवि यशवंत साठ वर्षांचे झाले. त्यांचा गौरव होत आहे आणि होऊं घातला आहे. रसिकांकडून होणारी ही प्रकट ऋणफेड उचितच आहे. ती केवळ उपचाराची नाहीं; तिच्यामागें आस्था आहे. पण असे हजारों स्त्री-पुरुष महाराष्ट्रांत आहेत कीं ज्यांची यशवंतविषयींची कृतज्ञता अबोल राहील, निदान तिचा सार्वजनिक उच्चार होणार नाहीं. हा वाचक विशेषतः पस्तिशीपारचा. रसिक म्हणून घ्यायलाहि तो अवघडेल. आपल्या काव्यप्रेमाची त्यानें जाणकारीनें मशागत केलेली नसते; हिरव्या वयांत कोठें कांहीं उगवलें असेल त्याची निगराणीहि केलेली नसते. मध्यंतरीं, एकदां नव्हे, अनेकदां, काव्यरीतीचे वारें पालटलेलें असते. नव्यानव्या वावटळींनी जणूं दिशांची अदलाबदल झाली, तरी त्याची त्याला कशाची क्षिती ! त्या गांवाकडे तो केव्हांच पाठमोरा झालेला असतो. पण या अर्ध्यामुकल्या प्रापंचिकांतहि कधीं अवचितपणें यौवन-वृत्तीची सळसळ होते, आणि जुन्या आठवणींची झुळूक कसलातरी मोहरून टाकणारा सुगंधी गारवा घेऊन येते. अशा आठवणींपैकींच एक म्हणजे कोवळ्या, ताज्यातवान्या, वयांत अंतःकरणाला भिडलेल्या काव्याची. तेव्हां भोवतालचें सगळें एकाएकी राठ आणि क्षुद्र वाटू लागलें होतें; अकारण हुरहूर फुटली होती ती चैनीनें कालान्तरानें मुरून फक्त असा गोडवा घेऊन उरली कीं जो वृत्तीच्या सणासुदीला चवीनें तोंडात घोळवावा. त्या काळीं यशवंतांच्या कवितांनी तसली तगमग करणारी जाग आणली होती; एखादीनें निसटता दंशहि केला असणार,--विशेषतः कवीच्या भरदार आवाजांत ती ऐकण्याचा योग आला असला तर ! तशा कविता अंगांत भिनतात; त्यांच्याशी तद्रूपता येते ती विनासायास, आणि त्या नकळत गुणगुणल्या जातात. आपण कविता म्हणतों या कल्पनेनेंहि चोरल्यासारखें वाटावें अशा परिस्थितींत तें अघटित घडलेलें असतें. सगळें तण माजलेलें, त्यांत मध्येंच काव्य-प्रीतीचा अंकुर उगवतो. यशवंतांनी विशेषतः आपल्या भराच्या काळांत असलें बीजारोपण विपुलतेनें केलें. काव्याशीं सोयरसुतक नसणाऱ्या आणि तें नसल्याची प्रौढी मिरविणाऱ्या, मध्यमवर्गाचा त्यांनी काव्याशी लगाबांधा जमवून दिला. रसिकता, कला-प्रेम हे थेर आपल्यासाठीं नव्हेत अशी त्या वर्गांतील

बहुतेकांची निष्ठा. तिनें त्या संस्कृति-सौन्दर्याची फार थोडयांपुरती मिरास केली. यशवंतानी ही कोंडी फोडली आणि काव्याचा कमी अधिक स्पर्श सर्वांना, निदान आपल्या-सारख्या मध्यमवर्गीयांना, होऊं शकतो हें द.खविलें. आपलीं सुखदुःखें आणि आशा—आकांक्षा या कवींनें बोलून दाखविली या जाणिवेनें "संस्कृतीच्या उन्हाळ्यांत जिवाची तल्खली" झालेल्या त्या वर्गाला दिलासा मिळाला. 'एवढी माझी कमाई' असें यशवंत कृतकृत्यतेनें म्हणाले तर तें सार्थपणेंच !

कवि म्हणून यशवंतांचा उदय झाला तो १९२१ मध्यें बडोदें येथें भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनांत. तेव्हां त्यांनीं कांहींसे विन-यानें आणि कांहींसें अभिमानानें, "दऱ्या-खोऱ्यांतला कवि" असें आपलें बिरुद सांगितलें. पुढें कांहीं वर्षांनीं त्याच बडोद्याचे राजकविपद यशवंतांकडे आलें, पण तें बिरुद त्यांनीं इमा-नानें वागविलें. कसल्या राज-इट्टापायीं कवि पदाची इभ्रत गमावली नाहीं. मुजरा केला तो इतिहासानें उजळलेल्या सिंहासनाला; दैववशात् त्यावर बसलेल्या व्यक्तीला नव्हे. या कवीला महाराष्ट्राच्या भूतकाळाचा प्रखर अभिमान आहे. रामदासांनीं पुनीत केलेल्या चाफळनें त्याचा पिंड घडविला; पण भावी काळाच्या प्रगतीची आसहि त्याच्यात आहे. नव्या उमेदी आणि जुने जिव्हाळे एकवटण्याची ईर्ष्या त्याच्यांत आहे.

मराठी रसिकांतर्फे कवि यशवंतांचे या शुभप्रसंगीं मनःपूर्वक अभिनंदन, आणि कृतज्ञ अभिवादन. त्यांना दीर्घ आणि संपन्न आयुष्य लाभो.

—मं. वि. रा.

## अरविंद गोखले यांचा विक्रम

दीपावलीचे एक लेखक आणि महाराष्ट्राचे आघाडीवरचे कथा लेखक श्री. अरविंद गोखले यांच्या 'गंधवार्ता' या कथेला 'एन्का-ऊंटर' मासिका तर्फे १०० पौंडाचें पारितोषिक मिळालें. ही कथा प्रसिद्ध झाल्यानंतर कांहीं परीटघडी टीकाकारांनीं ती अवास्तव आणि भोंगळ म्हणून नाकें मुरडलीं होतीं हें लक्षांत घेतां ज्या परीक्षक मंडळांत स्टीफन स्पेंडर-सारखे मार्मिक टीकाकार होते, अशा परीक्षक-मंडळाकडून गोखल्यांनीं वाहवा मिळविली हा त्यांचा आणि मराठी कथा वाङ्मयाचा गौरवच. गोखले यांचा 'अनमॅरिड विडो' या नांवानें एका कथा संग्रह या पूर्वीच इंग्रजींत प्रसिद्ध झाला आहे. श्री. गोखले जागतिक वाङ्मयाच्या आघाडीवर याहिपेक्षां यशस्वी होतील असा आम्हांला विश्वास वाटतो.

## सत्यं शिवं सुंदरम्

### "मुंबई राज्य कलाप्रदर्शन"

गेलीं तीन वर्षें सतत मुंबईत भरविण्यांत येणारें "मुंबई राज्य कलाप्रदर्शन" यंदा प्रथा मोडून पुणें येथें भरविण्यांत आलें. जवळ जवळ तीस चाळीस हजार रसिकांनीं हें प्रदर्शन उत्सा-हानें पाहिलें. प्रदर्शन यशस्वी झाल्याची पावती मिळाली ! अर्थात्च केवळ मुंबईतच प्रदर्शन भरविल्यानें प्रदर्शन यशस्वी होतें ही बाब खोटी ठरलेली आहे. इतर प्रांतांतही त्याला भरघोस पाठिंबा मिळून तें यशदायी ठरतें याचें हें प्रत्यक्ष उदाहरण आहे. म्हणूनच राज्यांतल्या सर्व शहरांतून तें भरविण्याची प्रथा आतां पाडली पाहिजे हें ओघानेंच आलें.

केवळ प्रदर्शनासाठीं सरकारनें या वर्षी पाऊण लाख रुपये खर्च केले त्यांतले अर्धा लाख निव्वळ पारितोषकाच्या रुपानें वांटण्यांत आले. अगदीं चार वर्षांपासूनच्या मुलांनीं देखील या प्रदर्शनांत भाग घेतला होता हें प्रदर्शनाचें आणखी एक वैशिष्ट्य !

यंदाचें हें प्रदर्शन पाहून कांहीं दर्दी म्हणवणाऱ्यांच्या तिखट नाकांला पक्षपातीपणाचा वास आला, प्रदर्शन कांहींसें 'एकांगी' वाटण्याचीही कुरकुर ऐकूं आली कारण सांप्र-दायी लोकांना या प्रदर्शनांतून मानाचें स्थान मिळूं शकलें नाहीं. वास्तविक ह्या प्रदर्शनाच्या बाबतींत परिक्षकांनीं चोखंदळपणा दाखवला त्या बाबतींत ते अभिनंदनास पात्र आहे. कारण सांप्रदायानीं मळवलेल्या वाटेनें यांचे बक्षिसाचे मानकरी गेलेले नव्हते. 'आम्ही नवा सांप्रदाय निर्माण केला, नवा आविष्कार निर्माण केला' म्हणून-ओरडायची मध्यंतरी फार मोठी लाट आली होती. ही लाट थोपवायची किंवा या आवाजाला प्रतिसाद द्यायचें धैर्य त्यावेळीं कुणाला झालं नाहीं. 'वास्तववादी' तर 'आळीमिळी गुपचिळी' करून होते, अजून आहेत; परंतु या नव्यानीं ती कोंडी फोडली आहे. "तुम्हीं ज्याला नवें नवें म्हणत होतां तें 'अमृताशेरगिल'चें होतें, लँगहॅमरचें होतें, पाश्चात्य अधुनिकांचें होतें; तुमचें स्वतःचें नव्हतें; परंतु आम्हीं कोंडी फोडली आहे. कांहीं तरी नवें म्हणून ज्याला म्हणतां येईल तें दिलेलें इयें आहे. तुम्हांला दुर्लक्ष करतां येणार नाहीं" असें हें आव्हान आहे. यंदाच्या प्रदर्शनांतील बक्षिसास पात्र ठरलेली चित्रें अप्रतिम आहेत, योग्य आहेत शिवाय एखादा अपवाद वगळतां विशेषकरून ज्यांना पहिलें दुसरें बक्षिस मिळालें ते सर्व विद्यार्थीच आहेत. हें पाहून माननीय कौतुक वाटलें आणि भावी विकासाचा आशेचा किरण स्पष्ट दिसूं लागला असें म्हटल्यास तें वावगेंच ठरेल !

### न रंगलेला संगीतोत्सव

"न मिळे अशि मौज कुणा पाहण्या नरा" अशी ज्याची जाहिरात केलेली होती तो 'सूर-सिंगार संसदे'चा स्वामी हरिदास संगीत महोत्सव चोबीतलाव येथील रंगभवनांत २८ फेब्रुवारी १० मार्च पर्यंत साजरा झाला. प्रत्यक्षांत महो-त्सवाचा अनुभव एकदम वेगळा आला. गेलीं तीन वर्षें संसदेला जमाखर्चाच्या बाबतींत यातायात सोसावी लागली होती. कांहीं हजारांचे नुकसान सोशीत 'संसद' कशीबशी संसार चालवीत होती. गेल्या तीन वर्षांचीच पुनरावृत्ति यंदाही झाल्यास तिचें आयुष्य संपुष्टांत आण-ण्याचा निर्णयही चालक स्पष्टपणें बोलून दाखवीत होते, आणि यंदा जसा चोख हिशेबी-पणा संस्थेनें दाखवला तसा दाखवला नसता तर कदाचित यंदाच संसदेचा निकाल लागला असता.

अर्थातच बहुसंख्य फुकट्या पण रसीक श्रोत्यांना याबद्दल ताण सोसावा लागला हे जरी निर्विवाद असलें, तरी ज्या पोशाखी श्रोत्यांपुढेंच संसदेचे चालक नतमस्तक होत, त्या पोशाखी श्रोत्यां-मुळेंच संस्था जगणार होती, ही गोष्ट दृष्टिआड करून चालणार नाहीं. बहुजन समाजाला परवडेल अशा रीतिनें दर ठेऊन उत्सव साजरे करणें, ही गोष्ट फक्त सरकारलाच शक्य होईल. खाजगी संस्थांना केव्हांही नव्हे ! मान्य-वर कलावंतांना आज बहुजन रसिकांच्या कौतुकाची किंमत राहिलेली नाहीं. 'दाम करी काम' हीच वृत्ति आज सर्व रसिकमान्य कलावंतांत दिसून येते. रकमेच्या कमी-जास्त-पणावरच गायन-वादनाच्या रंगतीचा चढ-उतार निदान आज तरी ठरलेल्यासारखा

अनुक्रमणिका

दिसतो आहे! तानसेनी, किंवा रहिमतखाँची चिन्मय-चिदाकार-लहरी वृत्ति आजच्या श्रेष्ठ कलावंतांत औषधालाहि दिसून येत नाहीं. तशीं थोर हृदयें आणि त्यांचा कलंदरपणा हीं आतां इतिहासजमा झालेलीं आहे. ते ज्ञानी आहेत, आपापल्या परीनें श्रेष्ठ आहेत; किंबहुना रसीक श्रोत्यांचे प्यारे आहेत; पण रुपयांच्या छनछनाटावर नाचणारें आहेत. जेवढी बिदागी तेवढेंच गायन वादन! तिथें रसिक श्रोत्यांची कदर त्यांना वाटत नाहीं.

यंदाच्या 'सूरसिंगार'चा उत्सव कलाकारांच्या हिशोबीवृत्तिमुळें तृतिय श्रेणीचा झाला असें खेदानें म्हणावें लागतें. या उत्सवातील कलांकाराची नालिका वाचली तर तो एक रत्नहारच वाटत होता. प्रत्येक खडा आपापल्यापरीनें चमकदार, पण ज्यास्त परिचयानें त्याचा बनावटपणा लक्षांत यावा तसेंच कांहींसें झालें होतें. कार्यक्रम न रंगल्या बद्दल जाणत्यानीं तक्रार केली त्याला उत्तरें मात्र विचित्र मिळालीं. कुणाला वेळ थोडा मिळाला, तर कुणाला उशिरां बसवलें कुणाला विनाकारण ताटकळून वेळच मिळाला नाहीं आणि जो मिळाला त्यावेळीं लहर लागली नाहीं, अशा अनेक तक्रारी आल्या; पण 'अंदरकी बात (बीज) नारायण जाने' हेंच खरें. असो! आठ दिवस हा जल्लोस ऐकला; परंतु एकही कार्यक्रम मनावर ठसला नाहीं. थोडासा परिणाम गाण्यांत भीमसेन जोशी, आणि दिल्लीचे नसीर खाँ, वादनांत विलायतखाँ आणि रविशंकर, अलिअकबर यांची जुगलबंदी एवढेच कार्यक्रम थोडेसे चित्ताकर्षक होते. ही या उत्सवाचा श्रोत्याच्या दृष्टीनें फलश्रुति! कार्यक्रमाचेंही समालोचन तें हेंच जय कलाकार! जय संगीत येवढेंच!

—गोपालन्

## राजकारण

### बियाणींचा शिस्तभंग

महाराष्ट्राच्या राजकारणांत विदर्भाचे जुने आणि नाणावलेले कॉंग्रेस कार्यकर्ते श्री. ब्रिजलाल बियाणी यांनी गेल्या महिन्यांत विधानसभेत द्वैभाषिक विरोधी भाषण करून कॉंग्रेसजन आणि समितीचे पुढारी यांना चांगलाच धक्का दिला. परंतु बियाणींचा द्विभाषिकाला असलेला विरोध हा स्वतंत्र विदर्भाच्या मागणीच्या पोटीं जन्माला आलेला असल्यामुळें संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीस तो फारसा उपयोगी नाहीं हें निश्चित. अर्थात बियाणींचें हें भलतेंच धाडस त्यांना अखेरीस महाग पडलें असून त्यांना कॉंग्रेस बाहेर पडावें लागत आहे. कॉंग्रेसची लोकप्रियता कितीहि ढासळो पण एकदां निश्चित केलेल्या धोरणाबाबत ठाम भूमिका घेऊन त्याविरुद्ध वर्तन करणाऱ्यास कडक शासन करण्याची प्रथा पक्षाच्या बळकटीच्या आणि एकजूटीच्या दृष्टीनें नेहमींच उपयुक्त ठरते. त्यामुळें या लहानशा घटनेपासून संयुक्त महाराष्ट्राच्या पुढाऱ्यांनीं बराचसा बोध घेण्यासारखा आहे. संघटनेंत असतांना प्रभावी वाटणारीं माणसें संघटने बाहेर एकाकी पडलीं कीं निष्प्रभ होतात हा जुना अनुभव आहे. सुभाषचंद्र बोस सारखा एकटाच त्याला असामान्य अपवाद. त्यामुळें कॉंग्रेस संघटने बाहेर पडलेले बियाणी शेठ आतां स्वतंत्र विदर्भाच्या मागणीच्या जोरावर आपली जनतेंतील लोकप्रियता आणि वजन कितपत टिकवूं शकतील हा प्रश्न आहे. एका अर्थानें त्यांच्या वैयक्तिक सामर्थ्याची कसोटीच आहे.

### विदर्भ विरुद्ध महाराष्ट्र

साहित्य संमेलनाचे व्यासपीठ ही राजकारण-चर्चा करण्याचें स्थळ नव्हे. बेळगांव साहित्य-संमेलनापासून ग. त्र्यं. माडखोलकर यांनीं हा एक नवा पायंडा पाडला. याला अनुसरून १५ मार्च रोजीं भरलेल्या विदर्भ साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षपदावरून प्रा. या. मु. पाठक यांनीं विदर्भ विरुद्ध जुना महाराष्ट्र असा एक वाद अवेळीं उपस्थित केला आहे. वास्तविक पाहातां मुंबईकर अथवा महाराष्ट्रातील १२ जिल्ह्यांतील जनतेला विदर्भ आणि तेथील जनता यांच्या बाबत दूरभाव अथवा द्वेष कधींच नव्हता. उलट विदर्भांतील साहित्यिक आणि विद्वान यांचे अनेकवार कौतुकच केलें असतानाहि या भलत्या वेळीं आपल्या मनांत असलेली ही अढी विनाकारण प्रदर्शित करण्याची प्रा. पाठक यांना कांहींच गरज नव्हती. कारण यांत स्पष्टवक्तेपणापेक्षां न्यूनगंडापायीं निर्माण झालेल्या संतापाचीच भावना बलवत्तर असावी.



साहित्य पॅकेटमार!

— विष्णुशर्मा

## देशकारण

### भारतीय अंदाजपत्रक

भारताचे नवशिके अर्थमंत्री श्री. मोरारजी देसाई यांचे पहिलेंच अंदाजपत्रक फारसें समाधानकारक नाहीं. या अंदाजपत्रकावर दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या यशापयशाची छाया पडली असून त्यांत येत्या वर्षीचें एकूण उत्पन्न ७४७.२१ कोटी रुपये अंदाजिलें असून ८२९·१८ कोटी रुपये खर्च होणार आहेत. याचा अर्थ असा कीं ८२ कोटि रुपयांची तूट पडणार आहे. पण अर्थमंत्र्यांनीं २३·३५ कोटी रुपये कांहीं करांत वाढ व इतर बदल करून सरकार जमा करणार आहे असें घोषित केलें. यांतील सुमारें ९० टक्के करांचें ओझें सामान्य माणसाला सोसावें लागणार आहे. हे महत्त्वाचे कर पुढीलप्रमाणें. रिफाईन्ड डिझेल ऑईल, व व्हेपरायजिंग ऑईल यांवरील कर, मोटार टायरवरील अबकारी जकात, आर्ट सिल्क, रेयॉन सूत व लांब धाग्याचें सूत यांवरील अबकारी जकात, वनस्पति तेलावरील जकातींत वाढ, सिगारेटस् वरील जकातींत फेरफार व जुळणी, व खांडसारी साखरेवरील नवा अबकारी कर या सर्व करांमुळें सामान्य माणूस पिचला जाईल कीं काय अशी भीति वाटेल. डिझेल आणि टायर्स यांच्यावरील करवाढीमुळें रस्ते-वाहतुक महागणार. ही रस्तेवाहतुक रेल्वे-वाहतुकीशीं अनिष्ट स्पर्धा करूं लागली म्हणून ही करवाढ केली असली तरी त्यामुळें शेती, व्यापार आणि उद्योगधंदे यांवरील उत्पादन खर्चांत वाढ होणार हे निश्चितच.

खांडसारी साखरेवर जकात वाढवून साखर-कारखानदारांची ओरड अर्थमंत्र्यांनीं बंद केली

असली तरी त्यामुळें भावाची समपातळी राखण्याची ते हमी देऊ शकणार नाहींतच. चहाची निर्यात वाढविण्यासाठीं चहावरील ज़कात कमी केली गेली ही गोष्ट त्यांतल्या त्यांत अभिनंदनीय असली तरी देशांतर्गत चहाच्या किंमतींत घट होण्याचा यामुळें संभव नाहींच.

८२ कोटी रुपयांची तूट असतां २३ कोटी रुपये कररूपानें वसूल करण्याचा हा यत्न अभिनंदनीय नसून त्यामुळें सरकारला तुटीच्या अर्थसंकल्पाचा आश्रय करावा लागेल आणि त्यामुळें जी चलनवाढ होईल त्यामुळें सामान्य माणसावरील भाववाढीचें संकट अधिकच तीव्रतर होईल. त्यामुळें हें अंदाजपत्रक समदृष्टीचें असें वर वर दिसलें तरी त्यांत अनेक धोके आहेत हें निर्विवाद.

## क्रीडा

### हिंदी क्रिकेटचा 'फार्स'

एक महिन्यापूर्वी हिंदी क्रिकेटविषयीं लिहितांना त्याच्या चालू चरिताचें वर्णन 'शोककथा' असें केलें; पण आतां त्यांत दुरुस्ती करायला हवी. त्या क्षेत्रांतील सत्ताधाऱ्यांच्या खेळाचे रंग घडोघडी बदलत असतात. या चंचल आणि नाचऱ्या करणीला शोककथेसारखे गंभीर नांव कशाला ? गेल्या कांहीं आठवड्यांत जें घडलें तें पाहून हंसावें कीं रडावें हेंच कळेना ! एकंदरींत हास्यास्पद भागच अधिक ! आणि 'रोज मरे त्याला कोण रडे' हा जुना आडाखा आहेच !

कीं म्हणावें पहिला अंक झाला तो शोकात्मक — आणि आतां दुसरा फार्सिकल ! पुढचें अंक कसल्या प्रकृतीचे असतील कोण जाणे ! एकूण हिंदी क्रिकेटचें नाटक झालें जन्माचें हेंच खरें !

त्या क्रिकेटच्या 'दादां'नी गेल्या महिन्यांत विशेष पराक्रम केला तो वेस्ट इंडीज विरुद्ध झालेल्या कसोटी सामन्यासाठीं कप्तान नेमण्याबाबत. त्या सामन्याकरवी आपल्या क्रिकेटची अब्रू आंतरराष्ट्रीय वेशीवर टांगल्यानंतर पुढच्या उद्योगांत ते काय चमत्कार करून दाखवतात इकडे सर्वांचें भयचकित लक्ष होतें. तो उद्योग म्हणजे येत्या इंग्लंडच्या दौऱ्यासाठीं खेळाडूंची निवड करणें ! प्रथम कप्तानाची वेस्ट इंडीजविरुद्ध चौघेजण झाले होतेच. आतां पांचवा कोण ? आणि खरोखरच त्यांनी पोतडींतून पांचवा नग काढला. तो म्हणजे बडोद्याचा दत्ताजी गायकवाड. वस्तुतः गायकवाडची संघांतच वर्णी लागेल कीं नाहीं याची वानवा होती. उत्कृष्ट बॅट्समन् आणि फील्डर म्हणून त्याची ख्याति खरी; पण अलीकडे त्याला विशेष उठाव नव्हता. आतां दैवयोगें त्याचा कप्तान झाला. पांच महिन्यांत असे हे पांच पांडव झाले !

अनपेक्षित धक्का देण्याचें नाट्यतंत्र क्रिकेट बोर्डाच्या अंगवळणीं पडलें आहे. पण ह्या धक्क्यामागेंहि एखादें सूत्र असतें कां ? पुढें कांहीं दिवसांनीं इंग्लंडला जाणाऱ्या संघाचे कारभारी म्हणून बडोद्याच्या महाराजांची निवड झाल्याचें वाचलें. तेव्हां वाटलें कीं तसें कांहीं 'राज'—कारण या मागें नसेलच असें नाहीं. दत्ताजीराव राजघराण्याच्या दशांतीलच. पुन्हा एकदां हिंदी क्रिकेटवरील पूर्वींचें संस्थानीं सांवट आठवलें. १९३६ सालच्या इंग्लंड दौऱ्यासाठीं विजयानगरच्या महाराज कुमारांची कप्तानपदीं वर्णी लागली होती. १९४६ सालीं पतौडीच्या नबाबांची. समाजवादी लोकशाही (इत्यादि) च्या काळांत आपण सरंजामशाहीची लोढणींहि टिकवून आहोंत !

संघाच्या निवडी बाबतहि एकदोन धक्के मिळालेच अर्थात्, सर्वांना मान्य होईल अशी निवड सहसा कोठेंच होत नसेल; पण बहुतेकांना अमान्य होईल अशी निवड आपलें "बोर्ड" सराईतपणें करतात. क्रिकेटमधून निवृत्त झाल्याचें जाहीर करून बसलेल्या गुलाम अहमदचें तट्टू घुसलेंच; त्याच फटींतून हैद्राबादचा जयसिंह आंत आला का ? रामनाथ केणी, मनोहर हर्डीकर, माधव आपटे यांच्या चहात्यांची निराशा झाली. आणि अपेक्षेप्रमाणें, पंकज रॉय आलाच—आणि तोहि वाजतगाजत, दुय्यम कप्तान म्हणून !

गेल्या आठ दिवसांत तर क्रिकेट विषयक बातम्यांनीं विशेष खळबळ माजवली आहे. निवड-समितीचे सभासद सी. रामस्वामी यांचें राजिनाम्याचें पत्र फार गाजलें. त्यानें या संघ निवडीचें, आणि समितीचें पितळ उघड केलें. समितीचे अध्यक्ष लाला अमरनाथ यांच्या उत्तरांत आपल्यावरच अन्याय झाल्याचा कांगावा आणि चौकशीस तयार असल्याची, व तिच्यांत दोषी ठरल्यास देशत्याग करण्याची नाटकी घोषणा इत्यादि मसाला आहे; तें वाचून पत्र संपते न संपते तोंच बातमी आली कीं गुलाम अहमदनें इंग्लंडला जाण्याचें नाकारलें आहे. आतां अशीच रंगत वाढणार का ? आपला क्रिकेट कंटाळवाणा होवो, पण क्रिकेटच्या वार्ता अधिकाधिक चटकदार होत आहेत.

—आणि खरोखरच क्रिकेटमधील या सांवळ्या गोंधळाची सरकारी चौकशी होणार आहे का ? ती नीट झाली तर अनेक उलाढालीं इसमांचे पारिपत्य होईल. आणि हिंदी क्रिकेटला बरे दिवस येतील...अर्थात् ती कोण करणार यावर बरेचसें अवलंबून आहे ! नाहींतर एका दादाला दुसऱ्या दादानें जाब विचारण्यासारखें व्हायचें !

— विराम

## समाजकारण

### महावीर कर्मवीर

महाराष्ट्राचे थोर शिक्षणसुधारक आणि समाजिक कार्यकर्ते कर्मवीर श्री. भाऊराव पाटील यांनाहि या वर्षी पद्मश्री हा किताब मिळाला आहे. सातारा जिल्हा ही कर्तृत्ववान पुरुषांची जणू खाणच. श्री. यशवंतराव चव्हाण, ग. दि माडगूळकर, चिंतामणराव कोल्हटकर, कवि यशवंत यांच्यासारखीं आपापल्या क्षेत्रांत तेजानें तळपणारीं माणसें कृष्णाकांठच्या काळ्या मातींत लोळली आणि तिच्याच तेथल्या पाण्यावर वाढलीं. कृष्णेच्या परिसरांत पीकपाण्याच्या सुगीबरोबर विद्येचाहि सुकाळ करावा असा ध्यास कर्मवीर भाऊराव पाटलांना लागला. निरपेक्ष त्यागाच्या भूमिकेवर जागोजाग विद्यामंदिरें सुरू झाली. या विद्यामंदिरांनीं मराठी तरुणांना स्वावलंबनानें स्वतःचा उत्कर्ष करून घेण्याची अपूर्व संधि मिळाली. प्राचीन गुरुकुलांतील आश्रमशाळांप्रमाणें या विद्यामंदिरांनी दक्षिणमहाराष्ट्रांत एक नवचैतन्य निर्माण केलें. भाऊरावांची रयतशिक्षण संस्था म्हणजे महाराष्ट्राच्या शैक्षणिक इतिहासांतील एक तेजस्वी पान. या संस्थेचे कर्मवीर म्हणजे प्राणच. भाऊरावांचें हें अपूर्व यश मिळण्याचें कारण अविरत श्रम. स्वतः कर्मवीर म्हणजे चालताबोलता उद्योगच. कष्ट हा त्यांच्या जीवनाचा महामंत्र. रांगड्या समाजाला आणि भव्य व्यक्तित्वानें आणि धारदार वक्तृत्वानें आकृष्ट करण्याचें सामर्थ्य त्यांच्याकडे आहे. भाऊराव पाटलांचे कार्य म्हणजे मराठी माणसांच्या सेवावृत्तीचें सुंदर प्रतीक.

या प्रतीकाचा भारत सरकारनें गौरव केला म्हणून सरकारचेंच अभिनंदन ! • • •






अनुक्रमणिका





# नवी पहांट

★ आम्ही काय करावें—भारतन् कुमारप्पा
☆ दुर्गतीची माऊली—कथा
★ मोहाचें झाड—रुपक कथा
★ व इतर उद्बोधक साहित्य

मद्यपानाची भारतीय प्रतिष्ठा सोमरसाच्या कुळकथेंत शोधण्याचा अनेकवेळां प्रयत्न झालेला आहे. तथापि पौराणिक दाखले आणि ऐतिहासिक अनुभव असें सांगतात कीं भारत मद्यपानाला फारसा अनुकूल नव्हता आणि नाहीं. आमच्या दैनंदिन जीवनांत आणि आचारविचारांत मद्याला प्रतिष्ठा अशी नव्हतीच. त्यामुळें भारतीय राजकारणांत मद्यपानबंदीची चळवळ फार लोकप्रिय झाली. कॉंग्रेसच्या स्वातंत्र्य लढ्याला दारू दुकानावरील सत्याग्रह हा एक प्रकारें उपकारक ठरला. त्यामुळें स्वातंत्र्यपूर्व काळांत दारूबंदी हें स्वतंत्र भारतांतील आमचें एक आवश्यक कर्तव्य राहील अशी घोषणा राजकीय धुरीणांनीं केली.

ही घोषणा प्रत्यक्ष अंमलांत आणण्याचें धैर्य मुंबई राज्यानें प्रथम दाखविलें. १९५० सालीं मुंबई राज्यांत संपूर्ण दारुबंदीचें धोरण अंमलांत आलें. हें धोरण या वर्षी विदर्भ आणि मराठवाडा या प्रदेशांना लागूं करण्यांत येत आहे. मद्यबंदीचें धोरण सर्वस्वीं यशस्वी झालें आहे असा सरकारचाहि दावा नाहीं. कायद्याला पळवाटा नेहमींच असतात आणि निघत राहाणार. तथापि त्यामुळें कायद्याला दोष देण्यांत अर्थ नाहीं. त्या कायद्याच्या अंमलबजावणींतील दोष दाखवून ते सुधारण्यासाठीं सहकार्यासाठीं सर्वांनीं आपला हात पुढें केला पाहिजे. ‘ दीपावली ’ तर्फे सरकारला हें सहकार्यच—



# आम्ही काय करावे ?

— भारतन् कुमारप्पा

स्वतंत्र हिन्दुस्थानच्या सरकारनें दारूबंदीची नीति स्वीकारून योग्यच केलें आहे. परंतु दारूबंदीसाठीं लोक जोंवर कांहींच करीत नाहींत तोंपर्यंत ती केवळ कागदावरच राहावयाची. दारूसारखें अनिष्ट केवळ कायद्यानें नाहींसें करतां येत नाहीं. या अनिष्टापासून आपण आपली सुटका करून घेतली पाहिजे, असें ज्यांना वाटत असेल त्यांनीं दारूबंदी यशस्वी करण्यासाठीं आपल्याकडून होईल तितका प्रयत्न केला पाहिजे.

या दृष्टीनें विचार केल्यास, एक प्रजा म्हणून दारूबंदीच्या कार्यास पुढें रेटण्यास आपण काय केलें आहे बरें ! दारूबंदी यशस्वी करण्यासाठीं आपण कायावाचामनें कसोशीनें प्रयत्न केला आहे काय ? पुष्कळ शिकलेले लोक बेकायदा दारू भरपूर मिळूं शकते अशी तक्रार करतात. असे जर असेल तर ती थांबवण्यासाठीं त्यांनीं आपले बोट तरी उचललें आहे काय ? किंवा योग्य अधिकाऱ्यांच्या निदर्शनास आणून देण्याचा प्रयत्न केला काय ? दारूबंदी जर सर्वस्वी निष्फल झाली असेल तर् ज्यांना दारू हें एक अनिष्ट आहे, असें वाटतें, त्यांनीं ती यशस्वी करून दाखवण्याचा प्रयत्न करण्याची जबाबदारी आपल्या अंगावर घ्यावयास नको काय ? हें त्यांचें कर्तव्य नाहीं काय ? दारूबंदीसारखा सामाजिक सुधारणेचा कायदा लोकांच्या सहकार्याशिवाय सफळ होणें सर्वस्वी अशक्य असतें. बेकायदेशीर किंवा चोरीची दारूविक्री थांबवण्याचा प्रत्यक्षपणें किंवा अप्रत्यक्षपणें कांहीं प्रयत्न न करतां अशी दारू वाटेल तितकी मिळूं शकते असें म्हणण्यास जबाबदार नागरिकाला लाज वाटली पाहिजे. कारण असें तो करतो तेव्हां त्याचे आचरण वाटेंत दोन माणसांत चाललेली मारामारी पाहून ती थांबवण्यासाठीं मधें पडण्याच्या ऐवजीं तसें करण्याचा प्रयत्न केल्यास आपल्याला मार बसून इजा होईल या भीतीनें मुकाट्यानें रस्त्याच्या पलीकडच्या बाजूला जाणाऱ्या भागूबाईसारखें असतें. गैरकायदा दारू गाळणें व जकातचोरीनें ती आणणें या गोष्टी थांबवण्यासाठीं राज्यांतील जबाबदार नागरिक म्हणून आपण संघटित झालों आहोंत काय ? जकातचोरी करणारे, गैरकायदा दारू गाळणारे व गैरकायदा दारू विकणारे व पिणारे यांना त्यांच्या अनिष्ट करणीपासून परावृत्त करण्यासाठीं आपण त्यांच्याशीं संपर्क साधण्याचा प्रयत्न केला आहे काय ? उलटपक्षी आपण जर असा कांहीं प्रयत्न केला नाहीं व सरकारच्या दारूबंदीच्या नीतीबद्दल त्याला शिव्या देऊनच समाधान मानून घेतलें तर आपलें हें वर्तन केवळ बेजबाबदारीचें गणले जाईल, इतकेंच नव्हे तर ज्या शोचनीय परिस्थितीबद्दल आपण सारखी तक्रार करीत असतो ती निर्माण करण्यांत आपलाहि हिस्सा आहे असें होईल. गांधीजी एक सोनेरी नियम पाळून वागत व आपणाहि तो लक्षांत ठेवण्यासारखा आहे. माणसानें स्वतःच्या आसपास जर एखादें अनिष्ट किंवा अनाचार चालत असेल तर त्याला आपणहि जबाबदार आहोंत असें समजून त्याविषयीं केवळ चर्चा करून स्वस्थ न बसतां जरूर पडल्यास एकट्यानें त्याचा सामना केला पाहिजे. आज व्यक्ति व वर्तमानपत्रें दारूबंदी निष्फळ गेली आहे अशी आरडाओरड करीत आहेत; परंतु तिला यशस्वी करण्यासाठीं यांच्याकडून कांहीहि प्रयत्न होत असल्याचें दिसत नाहीं.

" एक तर आपले कॉलेजांतील अध्यापक, शाळांतील शिक्षक व कॉलेजांतील विद्यार्थी आहेत. या सर्व लोकांना या कामाला रोज दोन दोन तास देण्यास अवश्य सांगतां येईल. दारूबाज रोज जेथें गोळा होतात तेथें त्यांनीं जावें, त्यांच्याशीं मिसळावें, त्यांच्याशीं संभाषण करावें, युक्तिवाद करून त्यांना समजून सांगावें व त्यांना शिक्षण देण्याच्या दृष्टीनें शांततापूर्वक पिकेटिंग करावें. लोक दारू कां पिवूं लागतात, त्यांचें दारूचें व्यसन कसें सोडवतां येईल, दारूच्या ऐवजीं त्यांना कोणतीं पथ्यकारक, आरोग्यास पोषक व परिणामकारक पेयें देतां येतील याचा आपली वैद्य व डॉक्टर मंडळी एकत्र मिळून विचार करतील व कांहीं इलाज शोधून काढतील अशी मी अपेक्षा बाळगतों. मग आपल्या स्त्रिया आहेत. असहकारितेच्या दिवसांत त्यांनीं मोठी कामगिरी करून दाखवली. त्यांचें पूर्वीचें काम पुनः सुरू करण्यासाठीं आतां पूर्वीपेक्षा जास्त अनुकूल परिस्थितींत त्यांची पुनः संघटना केली पाहिजे. त्यांची हजेरी दारूबाजांना दारू पिण्यापासून रोकण्यास उपयोगी पडेल व त्याबरोबरच त्यांच्या मार्गांतील अडचणीहि आतां कमी झाल्या आहेत. पूर्वी पोलिसचीं माणसें दूर उभे राहून बेपर्वाईनें केवळ पाहत राहत; आणि भामट्या लोकांना मदतहि करीत. आज आतां स्त्रियांना आपल्या दारूविरुद्ध चाललेल्या धर्मयुद्धांत त्यांच्याकडून मदतीची अपेक्षाहि बाळगतां येईल. नंतर आपली मद्यपाननिषेध मंडळें आहेत. त्यांपैकीं बहुतेक आजवर सुस्त व निष्क्रिय होतीं. आतां आपण त्यांना आळस झाडून या धर्मयुद्धांत झटून काम करण्यास प्रवृत्त केलें पाहिजे. वर निर्दिष्ट केलेल्या सर्व लोकांना व मंडळांना एक दारूबंदी लीग स्थापून त्यांत एकत्र आणून तीं नियमितपणें व व्यवस्थितपणें काम करतील अशी योजना केल्यास उत्तम होईल. सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे जेथें जेथें दारूचें अनिष्ट फैलावलें असेल त्या जागा शोधून काढून आपलें सर्व लक्ष व शक्ति त्यांवर केन्द्रित करणें हें होय. दारूचे मक्तेदार व दारूचा व्यापार करणारे यांच्या सभा घ्या व त्यांना आपले गुत्ते व दुकानें मनोरंजन केन्द्रांत कसे पालटून टाकावे व प्रामाणिकपणें व नीतीनें धंदा करून शुद्ध कमाई कशी करावी तें शिकवा."



*त्या कृत्येचे तिन्हीं सवाल पुरे झाले होते*
*फक्त एकाच सवालाच्या स्वीकारानें*
*कृत्या हांसत होती.*

# दुर्गतीची माऊली

—अनंतकुमार

**बा**बुराव आत्माराम देसाई ! गेल्या महिन्याच्या सव्वीस तारखेला तो वारला ! गांवचें मला पत्र आलें. त्याच्यांत या दुर्घटनेचा प्रामुख्यानें उल्लेख होता. थोड्याशा दुःखप्रदर्शनाबरोबरच सुटकेचाहि निःश्वास होता. गांव रोजच्या एका कटकटींतून मोकळा झाला होता.

वास्तविक बाबुराव आत्माराम देसाई हा माणूस वयाच्या पंचविशींत फारच चमकला, आणि त्यापुढें अकालीं मिळविलेल्या यशानें हुरळून जाऊन, चांडाळ चौकडीच्या जाळ्यांत अडकून, अतोनात दारू प्यायला लागला, आणि गांवचे रोज शिव्याशाप खात खात अखेर गेल्या महिन्यांत तो मेला, एवढें सांगितलें म्हणजे त्याची गोष्ट पुरी होते, विशेष आणखी कांहीं सांगायचें बाकी राहात नाहीं; परंतु मीं बाबुरायाच्या ऋणांत आहें. गेल्या वर्षी गांवीं गेलों असतांना मला तो भेटला. सकाळीं सर्विसची बस पकडायला मीं तिठ्यावर आलों तेव्हां आधल्या दिवशींच्या दिवसभर चढवलेल्या नशेवर, निवळण घ्यायला तो गुत्त्यांत जात होता. माझी त्याची नजरानजर झाली, तेव्हां तो घाईनें माझ्याकडे आला. आपल्या गार गार पांढऱ्या फटक हातानीं माझे हात पकडून, त्यानें माझी आस्थेनें चौकशी केली, उद्यां निश्चित भेटतों असें वचन देऊन जबरदस्तीनें मजकडून दोन आणे घेऊन झपाट्यानें तो गुत्त्यांत शिरला. दिवसभर रोजचा कार्यक्रम त्यानें अगदीं साग्रसंगीत केला होता; परंतु दुसऱ्या दिवशीं वचनाला जागून तो माझ्याकडे आला.

मातीनें मळलेल्या त्याच्या भगव्या सदऱ्यावर कसले तरी डाग पडले होते, सर्वांगाची चाळण झालेलें धोतर शरीराची कशीबशी लाज सांवरीत होतें, जुनेर झालेल्या चपला धडपणें पायांत नव्हत्या आणि कमींत कमी आठवडाभर तरी आंघोळ नसल्याची केंस आठवण करून देत होते. आपले विडीनें रांपलेले पिवळट दांत दाखवत तो हांसला, तेव्हां रात्रीं प्यालेल्या दारूच्या वासाचा भपकारा भपकन् माझ्या नाकांत शिरला. दुपारीं एक वाजेपर्यंत तो माझ्याशीं बोलला. अगदीं बाळपणापासूनच्या साऱ्या गोष्टींची उजळणी झाली होती. जेवणाचा आग्रह तऱ्हेतऱ्हेनें केला असतांना तो थांबला नाहीं- अगदीं गरजेच्या कामाचें निमित्त सांगून तो सटकला; परंतु जातांना आवर्जून आणि कळकळीनें त्यानें मला एक संदेश सांगितला. तो सांगतांना तो म्हणाला होता, " गांवच्या लहानथोरांना आज उपदेशाची गरज वाटत नाहीं, ज्याचें कुणीतरी मानावें अशी अधिकारवाणीच आज शिल्लक राहिलेली नाहीं. स्वतःपुढें आज ज्यालात्याला कांहींहि दिसत नाहीं. मीं करतों तेंच योग्य असेंच प्रत्येकाला वाटतें, आत्मस्तुती आणि परनिंदेचा तर अगदीं कळस झालेला आहे. गांव तुला मानतें तूं सांगितलें तर तें ऐकेल ! खरें मानेल, म्हणून मीं गेल्यानंतर माझा हा संदेश आळवून आळवून गांवाला सांग. म्हणजे भावी पिढी तरी योग्य तो धडा घेईल. एरवीं मीं आक्रोशकरून कितीही सांगितलें, तरी तें ' परोपदेशे पांडित्य ' ठरेल ! म्हणून म्हणतों मीं मेल्यावर ही गोष्ट आणि संदेश सांग, माझ्या ऋणांत राहूं नकोस ! "

बाबूराव गेला ! त्या मृतात्म्याच्या ऋणांत मला राहायचें नाहीं, अगदीं त्याच्याच शब्दांत सांगायचें तर ' मीं करतों तेंच योग्य असेंच प्रत्येकाला वाटतें ' तेव्हां त्यांने सांगितलेल्या गतानुगतीक संदेशानें कांहीं साधायचेंही नसेल कदाचित्; पण मला तें एकदां सांगून टाकायचें आहे. आणि ऋणमुक्तिचा निश्वास सोडायचा आहे. हा निश्वास सोडतांना मला बाबुरायाचा जिवनविहार आठवतो आहे. तो सांगितल्याशिवाय त्याच्या संदेशाला बळकटी येणार नाहीं असेंही वाटतें आहे.

\+ \+ \+

आत्माराम देसाई या प्रसिद्ध मिठाच्या व्यापाऱ्याचा बाबुराय एकुलता एक मुलगा. गोव्यांतली बहुसंख्य मिठागरें एकेकाळीं त्यांच्या मालकिचीं होतीं. संपत्तिचा पाट त्यांच्या घरांतून वाहात होता. आणि ही सर्व परिस्थिति गेल्या पन्नास वर्षांतली होती. त्याला कारणही तसंच विलक्षण होतें. तत्पूर्वी देसायांचें घराणें " जोडोनियां धन उत्तम व्यवहारें " अशा वृत्तिनें राहून योगक्षेम चालवणारें होतें; परंतू पन्नास वर्षांपूर्वी बाबुरायाच्या आजोबानें—एका किमया करणाऱ्या मांत्रिकाच्या एका नादीं लागून प्रचंड हवन करून संपत्तिच्या अभिलाषेनें कृत्येला वश करून घेतली होती. ही कृत्या ज्यावेळीं प्रसन्न झाली त्यावेळीं तिनें तीन सवाल बाबुरायांच्या आजोबांपुढें टाकले होते. एक-घरांतला शाळिग्राम नेऊन सामुद्रांत टाकणें, दुसरा घरांतल्या एका माणसाचा जीव घेणें, आणि तिसरा-दारु पिणें !

# मोठा....खूप मोठा

वांगड्यांचा विक्रेता : कसा काय धंदा चाललाय ?

फुग्यांचा विक्रेता : मोठा...खूप मोठा.

वांगड्यांचा विक्रेता : हें ऐकून जरा बरं वाटलं. कसं काय साधलं तें ?

फुग्यांचा विक्रेता : त्यांत काय आश्चर्य

वांगड्यांचा विक्रेता : गेल्याच महिन्यांत तुम्हीं म्हणत होता कीं धंदा अगदींच पडलाय...आणि खरी गोष्ट माझ्यापासून लपवूं नका हं.

फुग्यांचा विक्रेता : म्हणजे काय ?

वांगड्यांचा विक्रेता : वा ! एकाच महिन्यापूर्वीं तुम्हीं धंदा अगदीं बसल्याचें सांगत होता...खरं कीं नाहीं ?

फुग्यांचा विक्रेता : संपलं सगळं. झाल्या गोष्टीची चर्चा कशाला ? आणि त्यांत मला आतां कांहीं रस वाटत नाहीं.

वांगड्यांचा विक्रेता : तुमचें मद्यपान वेतानेंच चालू आहे ना ?

फुग्यांचा विक्रेता : खरं सागूं दोस्ता, मला फार लवकर समजलं कीं दारू ही उत्तेजक नाहीं अगर दारू पिणें ही आतां फॅशनहि राहिली नाहीं. दारू म्हणजे केवळ नाश आणि मी सांगतो त्यावर विश्वास ठेवा— माझा धंदा सुधारण्यास कोणती एक गोष्ट कारणीभूत झाली असेल तर ती म्हणजे मी **मद्यपान संपूर्णपणें वर्ज्य** केलें आहे. आणखी एक गोष्ट सांगू ? तुम्ही सुद्धां मद्यपान सोडून दिलंत तर तुमची स्थिति सुद्धां सुधारल्याशिवाय रहाणार नाहीं.

वांगड्यांचा विक्रेता : आतां कांहीं तरी खरं खरं सांगितलंस हं !

फुग्यांचा विक्रेता : त्यांत कांहीं नाहीं. रात्रीच्या वेळीं दारु घेतल्यानंतर मी काय काय यातना भोगल्या हे पाहिलं म्हणजे त्यांत कांहीं नवल नाहीं.

वांगड्यांचा विक्रेता : अच्छा.

फुग्यांचा विक्रेता : भेटूं पुन्हां कधीं तरी.



या तीहींपैकीं कुठलाही एक त्यांनी स्वीकारायचा होता. आणि तो स्वीकारल्यावर ती कृत्या त्यांना प्रचंड संपत्ति देणार होती.

पहिल्या सवालाचा स्वीकार ते कशाच रीतिनें करूं शकत नव्हते. शाळिग्राम समुद्रांत टाकायचा ? वाडवडिलांनीं ज्याची प्रतिष्ठापना केली, आणि ज्याची थोडिशी अवहेलना केली तरी कुलक्षयाचा शाप होता, त्या शाळिग्रामाला हात लावायचें धैर्य त्यांच्यांत नव्हतें. त्यांचें अंग थरारलें होतें. ही गोष्ट सोपी नव्हती.

दुसरा सवाल भयानक होता, घरांतल्या माणसाचा जीव घ्यायचा ? आणि तो कुणाचा ? आईचा ? वडिलांचा ? चुलत्याचा ? सर्वांनीं मायेचीं पाखर घालून त्यांना वाढवलें होतें. त्यांच्यासारखीं सोन्याचीं माणसें, लाखमोलाचीं माणसें, अशीं असंख्य हवनें करूनही त्यांना मिळालीं नसतीं, इथेंही त्यांनी हार खाल्ली होती !

राहाता राहिला होता तिसरा सवाल आणि तो मात्र सोपा वाटला त्यांना, दारू पिणें सोपें होतें. त्यामुळें प्रतिष्ठेला बाध येणार होता, अब्रूला कलंक लागणार होता; परंतु पुढें मिळणाऱ्या प्रचंड संपत्तिच्या लोभानें त्यांना त्याची किंमत वाटली नाहीं, आणि तिसरा सवाल त्यांनी स्वीकारला होता. तथास्तु ! म्हणून कृत्या अंतर्धान पावली होती.

त्यानंतर ते खूप दारू प्यायले होते, त्या नशेंतच रात्रीचे घरी आले होते. त्यांना अशा अवस्थेंत घरांतले वरिष्ठ वयोवृद्ध काका घरांत घेईनात. हा सारा कधीं न अनुभवलेला पहिला भ्रष्टाकार आपल्या घरांतल्या शाळिग्रामाला, वास्तु देवतेला खपणार नाहीं, म्हणून त्यांना घरांत न घेणाऱ्या काकांच्या पोटांत त्यांनीं जबरदस्त लाथ हाणली होती, ‘ हा कोण शाळिग्राम कीं जो मला माझ्या घरांत घेत नाहीं ? ’ म्हणून जबरदस्तीनें देव्हाऱ्यांत जाऊन त्या शाळिग्रामाला त्यांनी हात घातला होता. घरांत एकच हलकल्लोळ माजला होता, आणि बाबुरायाच्या आजोबांना नशा चढत होती. त्या नशेंत त्यांनीं तो शाळिग्राम बाहेर आणला आणि अंधारांत कुठेंतरी भिरकाऊन दिला. आधींच जबरदस्त लाथेच्या प्रहारानें जर्जर झालेल्या काकांनी शाळिग्राम फेकलेला पाहून त्या धक्क्यानेंच प्राण सोडला होता.

म्हणजे त्या कृत्येचे तिन्ही सवाल एका शेवटच्या सवालाच्या स्वीकारानें बाबुरायाच्या आजोबांच्या हातून पुरे झाले होते. बरोबरच कुलक्षयाचा शापहि त्यांनीं मिळवला होता. आणि कृत्या हांसत होती ! प्रसन्न होती !

पुढें त्यांनीं व्यापार वाढवला होता, अतोनात यशहि त्यांना मिळत होतें; परंतु एक दिवस चिक्कार पिऊन घरीं जातांना तोल जाऊन ते आड्यांत पडले आणि संपले.

वडिलांचा व्यवहार यशवंतरावांच्या हातीं आला. यशवंतरावांनीं तशीच परंपरा चालवली. यशवंतरावहि एकुलते एक. धंदा त्यांनीं चोख केला तो आणखी वाढवून ठेवला; त्याबरोबर पिणेंहि वाढवलें. आणि असेच एक दिवस नशेंत असतांना रात्रीचे घरीं येतांना त्याच आड्यांत पडून अकालीं गेले.

यशवंतराय देसायांचा एकुलता एक मुलगा बाबुराय. लहानपणापासून बाबुराय मामाच्या घरीं वाढला, सोळा–सतरा वर्षांपर्यंत तरी आम्हांला तो आमच्या गांवचा आहे हें देखील माहीती नव्हतें; परंतु सतराव्या वर्षी तो मॅट्रिक होऊन गांवात आला आणि केवळ आमचाच नव्हे, तर साऱ्या गांवाचा लाडका होऊन बसला. चांगलें फुललेलें आणि पिळदार शरीर घेऊन तो गांवात आला. आमच्या घराशेजारच्या वडाच्या पाराजवळचा ५ मणाचा दोंगडी गोळा सहज उचलून तो डोक्यावरून फेकी, आम्हां विशींतल्या तरुणांना त्यानें व्यायामाचें वेड लावलें. त्याच्या हातांत निरनिराळीं पुस्तकें, वृत्तपत्रें असत. रोज आम्हांला तो राजकारण, समाजकारण आदि विषयांवरचे विचार सांगे. अमक्यानें अमुक पुस्तकांत हें लिहिलें आहे, तमक्यानें तें लिहिलें आहे, असें सांगून त्यानें आम्हांला वाचनाचें वेड लावलें. नाटकांतलीं भाषणें अभिनयासकट रसभरीत आणि तोंडपाठ तो अशा रीतीनें बोले, कीं आम्हीं प्रत्येकजण त्याचें अनुकरण करण्यांत भूषण मानीत असूं.

निंदकांना तो आपलेसें करी, वृद्धांना तो प्रिय वाटे, आणि आमचा तर तो आदर्शच होता. आर्याभारत त्याला मुखोद्गत होतें. निरनिराळ्या प्रसंगीं उपमेसाठीं तो त्यांचा उपयोग करी. आपली कर्मभूमि निवडण्यासाठीं मीं गांव सोडलें, त्यावेळीं वडिलांचा धंदा त्यानें हातांत घेतला होता. आपल्या बुद्धिचातुर्यानें थोड्याच कालावधीनें गोमंतकांतल्या मिठाच्या व्यापाराचा त्यानें एक हात केला होता. त्याच्या कार्यशक्तिला उधाण आलें होतें !

कांहीं वर्षांनीं मी गांवांत परत गेलों त्यावेळीं तो प्यायला लागल्याची कुणकुण मी ऐकली होती. गांवच्या लोकांनीं त्याला परावृत्त करण्याकरितां अतोनात प्रयत्न केले. तो शपथा खाई, देवळांत जाऊन लिंगावर हात मारून प्रमाण होई; परंतु त्याची प्रतिज्ञा आठवडाभर देखील टिकत नसे ! एवढा शिकलेला-सवरलेला, जाणता, लोकांना उपदेश करणारा, लोकमान्य असा, हा माणूस शेवटीं कृत्येच्या आशीर्वादाला आणि घराण्याच्या वाल्यांच्या शापाला बळी पडला होता. व हें सारें जाणून बुजून ! त्याचें कारण त्यानें कुणालाही सांगितलें नव्हतें; पण त्याच्या बुडाशीं कांहीं कारण असावें असें मला मात्र राहून राहून वाटत होतें. शेवटीं गेल्या दोन महिन्यापूर्वी मी जेव्हां गांवाला गेलों तेव्हां त्यानें तें मला सांगितलें. त्यावेळीं तो तूर्यावस्थेंत होता. गेल्या अवघ्या पंधरा वर्षांत त्यानें साऱ्या व्यापाराची, साऱ्या संपत्तीची धूळदाण करून टाकली होती. बाई, बाटली, जुगाराच्या नादानें त्यानें स्वतःच्या घरावर नांगर फिरतांना पाहिला होता. दारूसाठीं रस्तोरस्तीं भीक मागितली होती. जे जें म्हणून निंदायुक्त असेल तें तें त्यानें केलेलें होतें. जो आपल्या अंगच्या उपजत गुणांनीं गांवचें भूषण झाला होता, तोच पुढें एक कटकटीचा विषय होऊन बसला होता. पुढें पुढें तर दोन आण्याची दारू आणि रुपयाची मस्ति या वृत्तिनें तो वागूं लागला. लोकांच्या दारांत जाऊन वर्माकर्मांनीं त्यांचा उद्धार करायला लागला होता. लोक हवालदिल झाले होते. त्या कधींही न सुटणाऱ्या व्यसनानें एकेकाळच्या तेजस्वी, मानी आणि बुद्धिमान बाबुरायाचें माकड बनवून टाकलें होतें.

बाबुराव जाणूनबुजून ज्या व्यसनांत पडला त्याचें कारण–जें त्याच्या दृष्टिनें फार मोठें होतें तें असें—

मामाच्या घरीं वाढल्या कारणानें त्याच्या नित्य सहवासांत असलेल्या मामांच्या मुलीवर त्यानें प्रेम बसलें. पुढें वडिलांच्या मृत्युनंतर बाबुरायाच्या मामांनीं बाबुरायाच्या आईला मुलाचें लग्न उरकून टाकण्यासंबंधीं टुमणें लावलें होतें. बाबुरायाच्या कानावर ही गोष्ट आली तेव्हां आईसमोर बाबुरायानें आपल्या मनींची भावना स्पष्ट केली होती; परंतु त्याचे मामा लावीत

( पान ५८ वर चालू )

अनुक्रमणिका










# मोहाचें झाड

— श्री. स. दाभोळकर

फार प्राचीन काळांतील गोष्ट.

एका अरण्यांत एक पोपट, एक वाघ आणि एक गाढव एकत्र रहात होते. यथेच्छ खावें प्यावें आणि मनमुराद भटकावें, हा त्यांचा नित्यक्रम.

कधीं कधीं पोपटाच्या संगीतानें, वाघाच्या मर्दानी खेळानें अन् गाढवाच्या तांडवनृत्यानें बहारच उडायची !

उन्हाळा संपला. पावसाळा उजाडला. पण मेघाच्या कृपेचें चिन्ह दिसेना. दुष्काळाच्या भीषण छाया लांब लांब पसरूं लागल्या. जलबिन्दु व धान्यकण दिसेनासे झाले. दिवसामागून दिवस लोटले. सारें रान भकास झालें. झाडाचें एक पान दिसेना. रानांवनांतले प्राणी तहानेनें आणि भुकेनें तडफडूं लागले.

शेवटीं राहावेना म्हणून त्या तिघांनीं एकमतानें दुसऱ्या रानांत जाण्याचा बेत केला. कांहीं वाट चालून जातांच—

" मित्रा, तहानेनं कंठ सुकला रे ! आतां पुढं एक पाऊलहि टाकण्याची माझ्यांत शक्ति राहिली नाहीं ! !....पाणी....पाणी !" वाघाच्या तोंडून कसेबसे शब्द निघाले.

बिचारें गाढव ! पाण्यासाठीं कुठं वणवण फिरावें सुचेना !

पोपटाचें मन द्रवलें. सारं बळ एकवटून तो भर्रकन् उडाला. पण खूप भटकून सुद्धां त्याला पाण्याचा एक थेंबही दिसेना. भटक भटक भटकून पंख शिणले त्याचे ! भोंवळ आली त्याला. आणि जमिनीवर आदळला तो.

त्याच्या परतण्याची वेडी आशा धरून वाघाचे आणि गाढवाचे त्याच्या वाटेकडे डोळे लागले होते. पण पोपट आतां परत येत नाहीं असं पाहून वाघानें गाढवास म्हटलें, " पाहिलंस, पाणी पहातांच पोपटाचा जीव लालचावला. स्नेह्यासोबत्यांना विसरला ता. "

गाढव, वाघाच्या मानानें फारच गळालेला आणि शिणलेला होता. वाघाला राहवलें नाहीं. पोपटाच्या शोधार्थ तो निघाला. रानावनांतून, गिरीकंदरांतून, दऱ्याखोऱ्यांतून त्यानें वाट कापली. पण कुठेंच त्याला ना पोपटाचा पत्ता लागला, ना पाण्याचा थेंब दिसला. आतां परत वळणार, तोंच त्याला दूरवर एक हिरवा ' ठिपका ' दिसला. हिरवळच होती ती. वाटलें, पाण्यावांचून हिरवळ जगणार कशी ?

त्या दिशेनं त्यानें धांव घेतली. पण हिरवळ नव्हती ती. पोपटाचें मृत शरीर होतें तें. एका जुन्या जिवलग सन्मित्राविषयीं आपण गैरसमज करून घेतला याचें त्याला राहून राहून वाईट वाटलें. पोपटाच्या मृत शरीरावर त्यानें झेप घेतली आणि हताशपणें त्याच्या शेजारीं अंग टाकलें.

इकडे गाढवाची आशा धुगधुगत होती. ती तळाला टेकली. पोपटाचा पत्ता नाहीं. पोपटासाठीं गेलेल्या वाघाचाहि पत्ता नाहीं. जगांत कुणी कुणाचें नाहीं हेंच खरें. असा आततायी विचार त्याच्या डोक्यांत चमकून गेला. निर्बळ खुरांनीं खुरडत खुरडत तो आपल्या वाटेला लागला.

कांहीं अंतर मागें टाकलें नसेल तोच त्याला दूरवर जें दिसूं नये तें दिसलें. आणि पश्चातापाच्या धगधगीनें त्याच्या जिवाची राख झाली.

पोपट आणि वाघ यांच्या मृत देहांशेजारींच त्यानें शेवटीं जीव सोडला.

दिवसामागून दिवस गेले. अवर्षणाची काळी छाया कमी होऊं लागली. आकाशाच्या कडा मेघांनीं लवल्या आणि—पृथ्वीवर जलदेवता उतरली.

चैत्र वैशाखाचे दिवस. तेंच उजाड आणि ओसाड रान फुलाफळांनीं बहरून निघालें आणि भूमातेच्या कुशींतून पूर्वी न पाहिलेलें असें एक रोपटें उगवलें.

रोपट्याचा वृक्ष झाला.

तो सुंदर फुलांनीं बहरला. वेड लावणारा सुगंध अवतीभोंवतीं तरंगूं लागला. उभ्या आयुष्यांत प्रथमच हें चमत्कारिक झाड पाहिलें असें जो तो बोलूं लागला.

एके दिवशीं त्या झाडाखालीं गर्दी जमली आणि त्यांच्यांत चढाओढ सुरू झाली. त्या झाडाच्या फुलांचा अर्क काढण्यांत प्रत्येक जण रमला होता. मातीचे घट काठोकाठ भरले. पहिला घट रिता झाला. प्यालेले ओठ पुन्हा पुन्हा पिऊं लागले. पण लागलेली तहान शमेना. कैफ चढला होता त्यांना ! नशा ओसंडत होती त्यांच्या डोळ्यांसून ! ! उन्माद संचारला होता त्यांच्या नसानसांत.

पहिला प्याला ओठाला लागतांच सारे पोपटाप्रमाणें बोलत राहिले.

दुसरा प्याला—! साऱ्यांना वाटूं लागलें आपण रानाचे राजे आहोंत. आणि तिसरा अजून ओठाला देखील लागला नसेल तोंच—त्यांच्यांत लाथाळी सुरू झाली.

तो वृक्ष मात्र आपल्या डोळ्याचें पातें न झाकतां तो सारा देखावा पाहूनच थरारला ! आणि त्याला वाटलें अरेरे यासाठींच कां मी जन्माला आलों !

* * *



अनुक्रमणिका




# वर्षाव

**श्री.** पु. भा. भावे यांच्या काव्यात्म वृत्तीचा, सौंदर्यवादी प्रवृत्तीचा प्रत्यय त्यांच्या ललित साहित्यांत वारंवार येत असतो, किंबहुना तोच त्यांचा स्थायीभाव आहे. तथापि ' वर्षाव ' या त्यांच्या कादंबरींत हा प्रत्यय विशेषत्वानें येतो असें म्हटलें तर तें चूक होणार नाहीं. वर्षाव वाचल्यावर एखादें हृदयस्पर्शी शोकगीत वाचल्याचा आनंद आपणांस होतो. शेलीच्या भावगीताच्या वाचनानें जसा आनंद मिळेल, सैगलच्या तोंडचा दर्दभरी गझल ऐकल्यावर जसा आनंद लाभेल तसा आनंद श्री. भावे यांचा कादंबरीच्या वाचनानें मिळतो.

कित्येक वेळां काव्यात्मकता, भावनांचें उधाण हीं सर्व कथानकाच्या गतींत अडथळा आणतांना आपण पाहतो; पण ' वर्षाव ' मध्यें निवेदनाची गति व भावनांचा वेग यांचा इतका सुंदर मिलाफ झाला आहे कीं त्यांमुळें या कादंबरीच्या कथानकाला विलक्षण गति येते.

ही कहाणी कुसुम या नांवाच्या दुर्दैवी, सुस्वभावी व सुंदर तरुणीची आहे. एका नामर्द इसमाशी तिचें लग्न लागलें आहे. त्यामुळें ती दुःखी आहे. ती मनानें थोर व प्रामाणिक आहे, सुग्रण व कुशल आहे, पण तिच्यावर नवरेपणाचा हक्क सांगणारे पेठे वकील हे नांवापुरतेच नवरे असल्यानें तिचें जीवन उध्वस्थ झालेलें आहे. या उध्वस्त जीवनांत तिला नायकाचा आधार सांपडतो. पण तिची नायकाकडून निराशा होते. कुसुमच्या या उध्वस्थ जीवनाची कहाणी नवलेखन तंत्राच्या उपासकांनीं अत्यंत गलिच्छ रीतीनें वर्णन केली असती; पण या शारीरिक अतृप्ततेची ही कहाणी शरीरसंबंधाशीं घोटाळत राहात नाहीं तर या अतृप्ततेनें निर्माण झालेलें कुसुमच्या भावजीवनांतील नैराश्य ती कथन करते आणि हें या कादंबरीचें फार मोठें यश आहे. यामुळेंच कुसुम इतकेंच नव्हे तर तिच्या दुर्दैवाला कारणीभूत झालेल्या पेठेमहाशयांबद्दलहि आपल्याला सहानुभूति वाटते. पेठे हा प्रथम चेष्टेचा विषय वाटला तरी त्याचीहि आपणांस करुणा वाटते. सर्वसाधारणपणें पुरुषास जें मिळावें तेंहि परमेश्वरानें दिलेलें नाहीं हें त्याचें दुर्दैव आहे. या भारावलेल्या वातावरणांत नायकाचा मित्र प्रभाकर कांहीं थंडगार झुळकीचा आल्हाद आपणांस मिळवून देतो. पण या ठळक व्यक्तींच्या स्वभावरेखाच फक्त स्पष्ट झालेल्या आहेत असें नाहीं तर उदार व मानवी स्वभावाचें चांगलें ज्ञान असलेल्या तेलंगबाई, नायकाचे व्यवहारचतुर वडील, चौकस आणि दीर्घ परिचयानें अधिक स्वातंत्र्य घेणारी वृद्ध मोलकरीण हीं पात्रें आपल्या... वर परिणाम करतात. दर्यासारंग दाव... तिरस्कारणीय वाटतो तर काळ्या... हा दोस्त वाटतो. श्री. भावे यांनीं... व्यक्तींचे भाव तर मार्मिकपणें वर्णन... आहेतच पण काळ्या कुत्र्याचे भावहि... तितक्याच मार्मिकतेनें चित्रित केले आहे...

या व्यक्तिचित्रणास स्वाभाविक संवा... जोड मिळाली आहे. संवाद लिहि... भाव्यांचें कौशल्य अनेकदां व्यक्त झालें ...

या कलाकृतींत उत्कृष्ट कलाकृतीचे सा... आहेत. नायिका धीट आहे पण वरेरक... सीतेवर जो धीटपणा लादला आहे त्या... रचा मूर्खपणाचा धीटपणा कुसुमजवळ ... नायक काव्यात्म आहे. सहानुभूति त्याच्या... आहे पण तो रंगेल नाहीं. वातावरण धुंद... पण हा धुंदपणा वाचकाला एका उच्च ... वरणांत नेऊन सोडतो. आणि म्हणून... कादंबरींत वाचकाला बरेच कांहीं ग... अर्थात त्यासाठीं स्वतःचीहि कांहीं प्राथ... तयारी असावी लागते, स्वतःचा वकुब ला... ज्यांना गाडगीळांची निरसता व क्लि... आवडतो व हडपांच्या सुखासीनतेपल... अधिक कांहीं अनुभवण्याची ज्यांची त... नाहीं त्या विजया • राजाध्यक्ष या सारख... याहि कादंबरींत कांहीं गवसणार नाहीं. वरेरकरांच्या दिल्लीतील स्थानावर ... ठेवून मौजेचे टीकालेखन करणाऱ्... भाव्यांच्या लिखाणांत कांहीं गवसलें नाहीं तो भाव्यांचा दोष नसून विजयच आहे.

**— गोविंद तळवल...**

---

( पान ५९ वरून )

असलेलें लग्नाचें द्रुमणें त्यांची स्वतःची मुलगी तेथें द्यायच्या इच्छेनें मुळींच नव्हतें. बाबुरायासमोर आणि आपल्या बहिणींच्या मनावर त्याचा काय परिणाम होईल याची पर्वा न करतां त्यांनीं बाबुरायाच्या आजोबांपासूनच्या कृत्यांची आणि त्यांना असलेल्या शापाची परवड ऐकवली होती. आणि असल्या कुलक्षयी घराण्यांत आपली मुलगी देणार नसल्याचें आवर्जून सांगून, बाबुरायाचा अपमान केला होता. लवकरच त्यांनीं आपल्या मुलीचं लग्नही करून टाकलें होतें.

भावानें केलेल्या अपमानानें बाबुरायाची आई तापली होती. त्या मन स्थितींत तिनें अंथरूण धरलें, आणि थोड्याच दिवसांत बाबुराय पोरका झाला होता. पुढें मामाचा सूड उगवायला त्यानें जीं कृत्यें केलीं आणि मामाला ' देमाय धरणी ठाय ' केलं आणि हें करतांना जे त्याला उपयोगी पडले, त्यांच्या नादानें तो दारू प्यायला लागला होता. मामाला भिकेला लाऊन त्यानें सूडाचें समाधान मिळवलें होतें त्याच बरोबर घराण्याच्या शापालाहि तो बळी पडला होता. दुःखांत सुख एवढेंच कीं त्यानें लग्नच केलें नाहीं.

आपली गोष्ट संपवून बाबुराय म्हणाला होता, "आपल्या गांवचा तरुण वर्ग आतां पिणें हें पाप मानीत नाहीं, मोठीं मोठीं वर्तु... जमतात त्याच्यांत गंमत म्हणून हलकी फुलकी दारु, प्रतिष्ठित... पणाच्या नावाखाली आज प्यायली जाऊं लागली आहे. त्यांत आ... पाप मानलें जात नाहीं. हेंच सुरवातीला मी करीत होतों; त्यावेळ... ज्यांत अधीक नशा नाहीं अशीच दारू मीही पीत होतों, परं... मनस्तापानें असो किंवा थकवा घालविण्यासाठीं असो, कसेंहि असो... माझ्यासारख्या विचारी माणसानें एकदां लावलेला हात आजपर्यंत... सुटला नाहीं. सुटणार नाहीं. तूं त्यांना समजाऊन सांग, कुठल्याहि... आसुरी मार्गानें संपत्तीच्या नादीं लागूं नका, आणि यशाच्या कैफां... दुसरें कांहीं करा पण या विषाला स्पर्शू नका ! " बस !

बाबुरायनें हा जुनापुराणा, गतानुगतिक, पौराणिक, ऐतिहासिक... जीर्ण आणि आबालवृद्धांना माहिती असलेला संदेश सांगितला... आणि "न करील कां पित्याची दुर्गतिंची माउली सुरा मार्ता" ही आर्या म्हटली. बाबुराय गेला ! देसाथांच्या घराण्यांची अखेर झाली; वरदान देणारी कृत्या कृतकृत्य झाली !

त्याचा संदेश कसला का असेना तो सांगून मी ऋणमुक्त झालों आहे.




## रसिक वाचकांसाठीं

दीपावली दर महिन्याच्या एक तारखेस प्रसिद्ध होतें. आपण दीपावलीचे सगळे अंक काळजीपूर्वक जपून ठेवावेत आणि मार्च अखेर या अंकांतील कथा, काव्य, निबंध, विनोदी लेख इत्यादि साहित्यांतील जें सर्वोत्कृष्ट वाटेल त्याची नोंद करून आपला निर्णय दीपावलीकडे पाठवावा. साहित्यिकांचे खरे परीक्षक शेवटीं वाचकच असें आम्ही मानतो. जें उत्तम असेल तें लोकप्रियतेच्या कसावरहि टिकलें पाहिजे अशी आमची खात्री आहे आणि या दृष्टीनें दीपावली-च्या वाचकांची आणि पर्यायानें लेखकांची ही कठिण कसोटीच आहे. यांत वाचकांना आणि लेखकांना दोघांनाहि पारितोषिकें देण्यांची आमची इच्छा आहे.

## पारितोषिकांची योजना

### यासाठीं दीपावली नियमित वाचा

उत्तम साहित्याचा दर महिन्यास कसा पुरवठा होईल आणि त्यांतील उत्कृष्ट असें साहित्य आपण वाचकांना कसें सादर करु शकूं याची काळजी आज प्रत्येक मासिकाच्या संपादकाला लागलेली असते. दीपावलीचे संपादकहि याला अपवाद नाहीं. जुन्या जाणत्यांच्या बरोबर नव्या नवथर लेखकांवरहि दीपावलीचें बारीक लक्ष आहे. अशा लेखकांकडून कसें लिहवून घ्यावें काय लिहवून घ्यावें याची दीपावलीचें संपादक मंडळ सदैव योजना आंखीत असतें आणि त्यानुसार सारखे प्रयत्नहि चाललेले असतात. पण इतकं करूनहि नवे नवे लेखक पुढें येत नाहींत. परिश्रम करून लिहिणाऱ्या लेखकांचाहि दुष्काळ आढळतो. अशा स्थितींत लेखनकलेंतील नवे नवे प्रयोग वाचकांना कितपत आवडतील, नव्या नव्या लेखकांकडे वाचक कितपत सहानुभूतीनें पाहातील याचीहि काळजी वाटते. यामुळें कांहीं तरी नवीन पण उत्कृष्ट देणाऱ्या लेखकांकडे वाचकांनीं लक्ष पुरवावें आणि अशा लेखकांनीं हिरिरीनें लिहावें यासाठीं दीपावलीनें एक योजना आंखली आहे. ती योजना अशी कीं, वर्षाच्या शेवटीं दीपावलीच्या वाचकांतून कथा, काव्य, निबंध इत्यादि साहित्यांतील सर्वोत्कृष्ट साहित्याच्या निवडीबाबत वाचकांचें मत मागवावयाचें. ज्या वाचकांचा निर्णय अचूक ठरेल त्यांना आणि लेखकांना दोघांनाहि आम्ही पारितोषिकें देणार आहोंत.

मात्र यासाटीं वाचकांनीं दीपावलीचा प्रत्येक अंक जपून ठेवावा. याशिवाय वर्षाचे बारा अंक जपून ठेवणाऱ्या वाचकांनाहि अल्पशी भेट दीपावली देणार आहे.

--यासाटीं दीपावली नियमित वाचा.

## हितचिंतकांचा प्रतिसाद

...अंक सुंदर आहे. विविधतेनें नटलेला आहे......दीपावलीचें भाग्य थोर व यश उज्ज्वल आहे.

**प्रा. अरविंद गोखले**, पुणें.

मार्च महिन्याचा दीपावली वाचला. दिवाळी अंकांत नवीन परंपरा निर्माण करणारें आपलें वार्षिक आतां मासिकाच्या व्यापक क्षेत्रांत तेंच कार्य करणार असल्याची कुणालाही खात्री पटावी असेंच स्वरूप याही अंकाचें आहे. जणुं दिपावली वार्षिकाचा एक तुकडाच. बहुसंख्य वाचकांची अभिरुची उत्पन्न करण्याचें कार्यही पार पाडलें जाईल...

**प्रा. वसंत वऱ्हाडपांडे**, हनुमान नगर.

...मी आज सकाळींच पुण्याहून आल्यानंतर मला "दीपावलीचा" अंक पहावयास मिळाला व अत्यंत आनंद झाला...एकूण अंकाचें ले औट उत्तम असून कव्हरही आकर्षक झालें आहे. अंकांतील साहित्य सवडीनुसार वाचून त्यासंबंधी यथावकाश कळवीन.

**मुकुंदराव किर्लोस्कर**, किर्लोस्करवाडी.

...दीपावलीचा अंक मोटा सुंदर झाला आहे. तिच्या वाढत्या-वाढत्या यशाबद्दल कुणालाहि शंका येणार नाहीं......

पुणे १०।३।५९ — **वा. भ. बोरकर**

नागपूर १०।३।५९

दीपावली मासिकांतील सर्वच साहित्याचा दर्जा पाहून मराटींत एका नवीन उच्च दर्जाच्या मासिकाचा जन्म झाल्याबद्दल आनंद झाला.

प्रा. **गुणाकर देशपांडे**

आपल्या लोकप्रिय वार्षिकाचें मासिकांत रूपांतर झालेलें पाहून आनंद झाला....चांगल्या दर्जाचें साहित्य पुरविण्याविषयींचा आपला लौकिक आहेच.

— **रंगनाथ कुळकर्णी**

अंक मिळाला. अंक फारच सुरेख आहे. दिवाळी अंकाची छोटी आवृत्तीच आहे म्हणाना.

**सुधाकर तोर्णे.**

अंक सुंदर आहे. तुमचा कुंचला आणि नामवंत लेखकांची लेखणी यांचा या अंकांत सुरेख संगम आढळून येत आहे. विविध सदरें आकर्षक आहेत.

**अ. ह. लिमये**

अंकाला सरस्वतीचें स्मरण करून आपण सुरवात केली आहे हें योग्यच आहे. महाराष्ट्र दर्शन, माननीय व्यक्ति, रसिकहो किती चतुर बायका, जुन्यातलें सोनें, जत्रेंतील चित्रें व बातली ही पाणपोई ही सदरें विशेष आकर्षक आहेत.

**नरहर काशिनाथ जोशी**

Mahim 10-3-59

Really 'Dipawali' has assumed the higher status in Marathi Magazines. The layout and the material is extremely good.

I wish all good luck. sincerely

**श्री. जांबोटकर**

हें मासिक श्री. दीनानाथ दलाल यांनीं जगदीश्वर प्रिंटिंग प्रेस, गायवाडी, मुंबई नं. ४ आणि कांहीं भाग न्यू भारत प्रिंटिंग प्रेस, ६, केळेवाडी, गिरगांव, मुंबई ४ येथें छापून दलाल आर्ट स्टुडिओ, ४०/४२ केनेडी ब्रिज येथें प्रकाशित केलें.

अनुक्रमणिका






